


# संख्याशास्त्र परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

## प्रकाशने मिळण्याची ठिकाणे

१. संचालक, शासन मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय
चर्नी रोड, मुंबई ४०० ००४
(दूरध्वनि क्र. ३६३२६९३)

२. व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार
जी. पी. ओ. नजिक, पुणे ४११ ००१.
(दूरध्वनि क्र. ६६८८५९)

३. व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार
सिव्हिल लाईन्स, नागपूर ४४० ००१.
(दूरध्वनि क्र. ५२२६१५)

४. पर्यवेक्षक, शासकीय पुस्तक भांडार,
शहागंज, गांधी चौकाजवळ, औरंगाबाद ४३१ ००५.
(दूरध्वनि क्र. २५५२५)

५. व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार,
कोल्हापूर ४१६ ००३.
दूरध्वनि क्र. ६५०३९५/६५०४०२




महाराष्ट्र शासन

# संख्याशास्त्र परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

१५ ऑगस्ट १९९६

मुद्रक :

व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व
लेखनसामग्री भांडार,
कोल्हापूर.

प्रकाशक :

भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य,
मुंबई.

मूल्य : रु. Rs 39 00

## भाषा सल्लागार मंडळ

### अध्यक्ष

डॉ. वि. भि. कोलते

### सदस्य

प्रा. गं. बा. सरदार
डॉ. ग. मो. पाटील
प्रा. भगवंत देशमुख
श्री. देवीसिंग व्यं. चौहान
श्री. वि. गो. देशमुख
प्रा. अरविंद मंगरूळकर
श्री. पी. बी. साळुंखे
प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर

### सदस्य-सचिव

श्री. प. ग. पाटील,
भाषा संचालक

## संख्याशास्त्र उपसमिती

### अध्यक्ष

प्राचार्य नी. मा. डोंगरे, मुंबई विद्यापीठ, मुंबई

### प्रतिनिधि-सदस्य

डॉ. गु. बा. मराठे, पुणे विद्यापीठ, पुणे
प्रा. व. के. जोहरापूरकर, नागपूर विद्यापीठ, नागपूर
डॉ. सु. ग. प्रभुआजगावकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
प्राचार्य प्र. भि. कोष्ठी, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
प्रा. (श्रीमती) प्रेमला काळे, श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ, मुंबई
प्रा. (श्रीमती) प्रभात रानडे, श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ, मुंबई
प्रा. अ. ग. लेले, मराठी विज्ञान परिषद, मुंबई
प्रा. सि. म. पाटील, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
प्राचार्य अ. द. ओक, मुंबई विद्यापीठ, मुंबई
प्राचार्य पां. ना. फुटाणे, मुंबई विद्यापीठ, मुंबई

### सदस्य-सचिव

श्री. ग. गो. पाठक, भाषा उपसंचालक

# प्रस्तावना

मातृभाषा शिक्षणाचे माध्यम असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. महाराष्ट्र राज्यात मराठीला राजभाषेचे स्थान मिळाल्यानंतर पदवी परीक्षेपर्यंतच्या शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हा विचार दृढ झाला. माध्यमाचे हे परिवर्तन घडवून आणण्यात अर्थातच अडचणी होत्या. मुख्य म्हणजे शास्त्रीय व तांत्रिक विषयांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. निरनिराळे विषय शिकवण्यासाठी आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भ पुस्तके मराठीतून लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते. परंतु ते मर्यादित स्वरूपाचे व त्यांच्यापुरते होते. सर्व विद्यापीठांतून समान व एकरूप परिभाषा वापरली जावी यासाठी नव्याने प्रयत्न करणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी १९६७ साली महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची संयुक्त बैठक घेण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी आणि संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ व महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ यांच्याकडे सोपवावे असे ठरले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांमधील काही मूलभूत विषयांच्या उपसमित्या प्रथम स्थापन करून व काही निदेशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या कामास सुरुवात केली. या उपसमित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी आणि मराठी विज्ञान परिषदेचा प्रतिनिधी यांना सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषा तयार करताना, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती जवळची वाटेल याचे भान ठेवणे आवश्यक होते. त्यामुळे ही परिभाषा मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा न येता केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी शक्यतो मिळतीजुळती ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला.

संख्याशास्त्र परिभाषा निर्मितीचे काम एक उपसमिती नेमून पूर्ण करण्यात आले आहे. या उपसमितीची पहिली बैठक दिनांक २३ एप्रिल १९७९ रोजी झाली. उपसमितीच्या एकूण ११७ बैठकी झाल्या व त्यांत सुमारे ५,१०० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित करण्यात आले. शेवटची बैठक दिनांक १३ मार्च १९८३ रोजी झाली. ही, संख्याशास्त्र उपसमिती व गणितशास्त्र गट यांची संयुक्त बैठक होती. हा परिभाषा कोश तयार करताना उपसमितीने, या विषयातील विद्यापीठीय स्तरावरील पारिभाषिक संज्ञा विचारात घेतल्या तसेच संदर्भादाखल, केंद्र सरकारने तयार केलेल्या शब्द-संग्रहाचाही वापर केला. याशिवाय आणखी काही संज्ञांचा अंतर्भाव करणे नंतरच्या टप्प्याला उपसमितीला आवश्यक वाटल्याने अशा संज्ञांचा अंतर्भाव असलेले परिशिष्ट ( सुमारे २७० संज्ञा ) या कोशाच्या शेवटी दिले आहे.

उपसमितीच्या बैठकींना अभ्यागत म्हणून निरनिराळ्या विद्यापीठांचे संस्कृत तज्ञ व संख्याशास्त्र विषयाचे प्राध्यापक उपस्थित राहिले. त्यांचे तसेच सहयोगी सदस्य म्हणून नागपूर विद्यापीठाचे प्रा. वि. गो. भांबुरकर यांचे या परिभाषा निश्चितीच्या कामात बहुमोल सहाय्य झाले.

उपसमितीचे अध्यक्ष प्राचार्य नी. भा. डोंगरे व सदस्य, प्राचार्य पां. ना. फुटाणे, प्राचार्य अ. द. ओक या तिघांनी हा कोश मुद्रितांच्या टप्प्यावर संपूर्णपणे तपासण्याचे व त्रुटींवर चर्चा करून त्यांचे निराकरण करण्याचे काम मोठ्या आस्थेने केले याचा येथे कृतज्ञतापूर्वक निर्देश केला पाहिजे.

या कोशाच्या मुद्रणाच्या कामात संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई, यांचे बहुमोल सहकार्य मिळाले. या सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. तसेच निरनिराळ्या प्रकारच्या मुद्रांचा उपयोग करून या कोशाचे बिनचूक मुद्रण करण्याचे काम आस्थापूर्वक करून कोल्हापूर येथील शासकीय मुद्रणालयाने या कोशाच्या प्रकाशनाच्या कामी आपला महत्त्वाचा वाटा उचलला आहे. या मुद्रणालयातील अधिकारी व कर्मचारी यांनीही वेळोवेळी केलेल्या सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना, तसेच या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना व सर्व संबंधित शास्त्र विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, शिक्षण, भौतिक, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, कृषिशास्त्र, शरीर-क्रियाशास्त्र, जीवशास्त्र, राज्यशास्त्र, वाणिज्यशास्त्र (सुधारित), साहित्य समीक्षा, अर्थशास्त्र, लोकप्रशासन, धातुशास्त्र, मानसशास्त्र, ग्रंथालयशास्त्र (सुधारित) व व्यवसाय व्यवस्थापन या विषयांचे परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच भूगोल, भाषाविज्ञान, गणितशास्त्र (सुधारित), रसायनशास्त्र (सुधारित), विकृतिशास्त्र, औषधशास्त्र व वृत्तपत्रविद्या या विषयांच्या परिभाषेचे काम पूर्ण होण्याच्या मार्गावर असून ते कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत 'संख्याशास्त्र परिभाषा कोश' हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे.

शास्त्रीय परिभाषा ही सतत विकसित होत असते. या कोशातील परिभाषेचा जाणकारांनी आपुलकीने व अभ्यासू वृत्तीने विचार करावा व या परिभाषेचा वापर करताना त्यांच्या नजरेस येणाऱ्या उणिवा भाषा संचालनालयाच्या निदर्शनास आणून द्याव्यात तसेच ती सुधारण्याच्या दृष्टीने काही सूचना करावयाच्या असल्यास त्या, भाषा संचालनालयाकडे अवश्य पाठवाव्यात अशी विनंती आहे.

या समितीचे अध्यक्ष, सदस्य, सहयोगी सदस्य आणि अभ्यागत यांनी परिभाषा निर्मितीसाठी घेतलेल्या परिश्रमाबद्दल आणि महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलसचिव यांनी वेळोवेळी केलेल्या सहकार्याबद्दल शासनाच्या वतीने मी त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानतो.

**प. ग. पाटील,**
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

मुंबई.
दिनांक : १ मे १९९५

# प्रास्ताविक

**समष्टि – घटक – व्यक्तीनाम्**
**मेय – लक्षण – मापनात् ।**
**प्राप्त – संख्या – विमर्शाय**
**संख्याशास्त्रं प्रवर्तितम् ॥**

(स्वकृत)

भाषा सल्लागार मंडळाच्या संख्याशास्त्र उपसमितीने तयार केलेला संख्याशास्त्र परिभाषा कोश प्रसिद्ध होत आहे. हा कोश वाचकांच्या हातात देताना एक महत्त्वाचे काम पार पाडल्याचा आनंद मला व माझ्या सहकाऱ्यांना होत आहे.

संख्याशास्त्र हे एक स्वतंत्र उपयोज्य शास्त्र आहे. थोडासा अतिशयोक्तीचा दोष पत्करून असे म्हणता येईल, की जीवनाचे एकही अंग असे नाही की ज्यात संख्याशास्त्राचा उपयोग होत नाही. अर्थशास्त्र, मानसशास्त्र, समाजशास्त्र, जीवशास्त्र, इत्यादी अनेक विद्याशाखांत संख्याशास्त्राचा उपयोग होतो. इतकेच नव्हे तर अशा उपयोजित विषयांना अर्थमिति (Econometrics), मानसमिति (Psychometry), समाजमिति (Sociometry), जीवमिति (Biometry) अशी स्वतंत्र नावेही मिळाली आहेत. प्रस्तुत कोशाचा उपयोग ह्या उपयोजित विषयांच्या अभ्यासकांना व्हावा म्हणून समितीने केवळ संख्याशास्त्रीय कोशांतून किंवा पुस्तकांतून शब्द घेतले नाहीत, तर ह्या उपयोजित विषयांवरील पुस्तकांतूनही पारिभाषिक शब्द घेतले. उपयोजित विषयांतील पारिभाषिक संज्ञांसाठी मराठी प्रतिशब्द ठरवताना समितीपुढे बऱ्याच वेळा एक समस्या उभी राहत असे. तिच्याविषयी थोडेसे विवेचन करणे इष्ट आहे असे वाटते.

उपयोजित विषयांपैकी काही विषयांची (उदा. अर्थशास्त्र, वाणिज्य) परिभाषा आधीच तयार झाली होती, तर काही विषयांची (उदा. मानसशास्त्र, व्यवसाय व्यवस्थापन) परिभाषा याच वेळी तयार होत होती. त्यामुळे ह्या विषयांच्या पारिभाषिक संज्ञांपैकी बऱ्याच संज्ञांचे प्रतिशब्द आयते उपलब्ध होते. हे प्रतिशब्द

जसेच्या तसे स्वीकारावयाचे, का त्यात बदल करावयाचा ही ती समस्या. या समस्येची सोडवणूक करण्यासाठी समितीने सर्वसाधारणपणे असे धोरण अवलंबिले, की जर प्रस्तुत शब्द मूलतः त्या त्या विद्याशाखेचा असला तर त्या विद्याशाखेने ठरविलेला शब्दच घ्यावयाचा. पण जर त्या शब्दाच्या आशयात संख्याशास्त्राचा भाग जास्त असला तर आवश्यक वाटल्यास वेगळा प्रतिशब्द घ्यावयाचा.

परिभाषा निश्चितीतली दुसरी एक समस्या म्हणजे एका इंग्रजी शब्दाला एकच एक मराठी प्रतिशब्द द्यावयाचा, की अनेक द्यावयाचे, ही होय. या संदर्भात सुरुवातीचे परिभाषा कोश पाहिले तर त्या कोशकर्त्यांनी सर्वसमावेशक धोरण अवलंबिले होते व एका इंग्रजी शब्दाला अनेक प्रतिशब्द सुचविले होते असे दिसते. काळाच्या ओघात या अनेक पर्यायांपैकी जो सर्वात अधिक चांगला असेल तो टिकेल व बाकीचे आपोआप 'निरुपयोगी' होऊन प्रचारातून जातील अशी त्यांची अपेक्षा होती. ही अपेक्षा व हे धोरण त्या काळात (१९४८) योग्यच होते. पण आज मात्र ते धोरण स्वीकारणे योग्य होणार नाही. कारण महाविद्यालयीन व विद्यापीठीय पातळीवर मराठीतून पुस्तके लिहिणाऱ्या लेखकांसाठी हा कोश तयार करण्यात येत आहे व अशा सर्व पुस्तकांत समान परिभाषा असणे हे संदिग्धता टाळण्यासाठी अनिवार्य आहे. म्हणून विविध पर्यायांतून निवड करण्याचे काम समितीनेच केले. तथापि क्वचित जागी हा आदर्श पाळता आला नाही आणि एका इंग्रजी शब्दाला अनेक प्रतिशब्द दिल्याचे आढळून येईल. वेगवेगळ्या लेखकांनी वेगवेगळे शब्द वापरले तरी वाचकाचा घोटाळा होणार नाही अशाच ठिकाणी असे अनेक पर्याय सुचवले आहेत. या बाबतीत समितीने एक काळजी कटाक्षाने घेतली आहे ती अशी की दोन वेगवेगळ्या इंग्रजी शब्दांना तोच मराठी प्रतिशब्द नसावा, म्हणजे कोणत्याही मराठी शब्दाने इंग्रजीतल्या एकाच शब्दाचा वाचकाला बोध होईल व त्याचा घोटाळा होणार नाही. गणितातल्या संगतीच्या भाषेत असे म्हणता येईल की इंग्रजीची मराठीशी संगती एकास अनेक असली तरी मराठीची इंग्रजीशी संगती एकास एक अशीच असावयास हवी; व तशी ती आहेही.

परिभाषा कोशाचे कार्यक्षेत्र इंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द देणे एवढेच मर्यादित नसते, कारण बहुसंख्य शब्दांच्या बाबतीत प्रतिशब्द देऊन भागत असले तरी काही शब्दांसाठीं स्पष्टीकरणात्मक टीपांची आवश्यकता असते. गणित कोश ( आवृत्ती पहिली ), भौतिकशास्त्र कोश, इत्यादी यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या कोशांत ही स्पष्टीकरणे इंग्रजीत असत. गणित कोशाच्या दुसऱ्या आवृत्तीत ती मराठीत येणार आहेत. प्रस्तुत कोशातही ती मराठीतच दिली आहेत. वस्तुतः समितीचा एकेकाळचा विचार असा होता, की प्रा. गो. रा. परांजपे यांच्या वैज्ञानिक पारिभाषिक कोशाप्रमाणे या कोशातही प्रत्येक संज्ञेचे स्पष्टीकरण द्यावे. परंतु या कामाचा व्याप आणि प्रत्येक संज्ञेचे स्पष्टीकरण देण्याची अनावश्यकता यांचा विचार करून समितीने असे ठरविले, की ज्या पारिभाषिक शब्दांचा अर्थ स्पष्टीकरणाशिवाय सुलभतेने समजणार नाही अशाच शब्दांचे स्पष्टीकरण द्यावे, व त्याप्रमाणे निवडक शब्दांचे स्पष्टीकरण दिले आहे. या स्पष्टीकरणांमुळे कोशाच्या उपयोगाचे क्षेत्र वाढेल, कारण ही स्पष्टीकरणे म्हणजे पारिभाषिक शब्दांचा उपयोग कसा करावा याचे वस्तुपाठच आहेत.

कोषात नाणी असतात, कोशात शब्द असतात. कोषातली नाणी चलनी झाली, त्यांचा लोकांनी स्वीकार केला आणि ती व्यवहारात वापरली म्हणजेच त्यांना त्यांचे मूल्य प्राप्त होते. त्याचप्रमाणे या कोशातले शब्द चलनी व्हावेत आणि संख्याशास्त्राचे शिक्षक आणि लेखक त्यांचा उपयोग करून त्यांना मूल्य मिळवून देतील अशी आशा व्यक्त करून हे प्रास्ताविक संपवतो.

नागपूर.
दि. २४ जुलै १९८३.

नी. मा. डोंगरे
अध्यक्ष,
संख्याशास्त्र परिभाषा कोश उपसमिती.

# कोशपरिचय

## कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :—

**इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम :—** इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून A Dictionary of Statistical Terms ( 4th edition ) — Sir M. G. Kendall & W. R. Buckland; Chambers's Technical Dictionary व Webster's Third New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन (spelling), इत्यादींसाठी आधार घेतला आहे. काही संज्ञांचा वर्णानुक्रम लावताना (उदा. पृ. १२४ यावरील संज्ञा) अगदी काटेकोर न राहता कोश वापरणाऱ्या विद्यार्थ्यांची सोय लक्षात घेऊन थोडेबहुत स्वातंत्र्य घेतले आहे.

**इंग्रजी शब्दजाती :—** प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शवली आहे (जसे :—*n.*; *adj.*; *v.t.*; *v.i.*, इ.). इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शवलेली नाही.

**पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे :—** इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसात, 'as in:' असे देऊन त्या पर्यायांचा उपयोग करून दाखवला आहे. आवश्यक त्या ठिकाणी संज्ञेचे मराठी स्पष्टीकरणही दिले आहे.

**मराठी शब्दजाती :—** इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शवली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शवली नाही.

**लिंगनिर्देश :—** (१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे, तो नाम असल्यास, लिंगनिर्देश केला आहे. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे.

**शब्दकुळे :—** शब्दकुळातील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यातील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवतात. असे शब्द त्यांतल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तिथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृष्ठ ६७ वरील lot हे कूळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**जोडसंज्ञा :—** काही महत्त्वाच्या पारिभाषिक संज्ञांखाली त्या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शवणाऱ्या जोडसंज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृष्ठ १०५ वरील scale ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**समानार्थी शब्द :—** काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शवण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दासमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात ( *also* ) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शवला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर ( = ) अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शवला आहे.

* * *

# भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली निदेशक तत्त्वे

१. **शब्दसंग्रह व पर्याय :—** हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना, केंद्र सरकारने विज्ञान व तंत्र क्षेत्रात यापूर्वी झालेल्या कार्याचा आढावा घेतला होता आणि निरनिराळ्या राज्यांत याबाबत झालेल्या एकूण कार्याचा समन्वय करण्याचे प्रयत्नही केले होते. मराठी परिभाषेची निर्मिती करताना देखील त्याच धोरणाचा अवलंब करून प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करणे अगत्याचे आहे. त्यासाठी प्रत्येक विद्याशाखेची केंद्र सरकारने तयार केलेली विज्ञान शब्दावली आधारभूत मानून, पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांच्या शब्दावल्यांचाही विचार करावा. तसेच माध्यमिक स्तरावरील .वैज्ञानिक व तांत्रिक विषयांच्या पाठ्यपुस्तकांतून पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे जे पर्याय रूढ झाले आहेत, ते देखील विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा :—** 'आंतरराष्ट्रीय संज्ञा' या शक्यतोवर त्यांच्या प्रचलित इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे.

आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणतः पुढील गोष्टींचा समावेश होतो :—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे वगैरेंसह) यांची नावे. ही नावे लिप्यंतरित करून देताना नावांपुढे त्यांची संकेतचिन्हेसुद्धा द्यावीत. जसे.— हायड्रोजन (H), कार्बन (C).

मात्र, मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जसेच्या तसे ठेवावेत. जसे.— तांबे Cu, किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानिक $90^{Th^{238}}$, निकोटीन $C_{10}H_{14}N_2$.

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून, पुढीलप्रमाणे द्यावीत :—


सोडिअम बायसल्फेट + सोडिअम क्लोराईड = सोडिअम सल्फेट + हायड्रोक्लोरिक आम्ल

$NaHSO_4 + NaCl = Na_2SO_4 + HCl$

गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे, इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच राहावेत; परंतु रासायनिक संयुगांची नावे देताना ती त्यांच्या प्रचलित इंग्रजी अथवा ग्रीक नावांप्रमाणेच द्यावीत.

(ब) वजने, मापे आणि परिमाणे. जसे.— कॅलरी, ॲम्पिअर वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात. जसे.— फॅरनहाइट श्रेणी (फॅरनहाइट), व्होल्टामीटर (व्होल्टा), ॲम्पिअर (ॲम्पिअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूशास्त्र, इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा (binomial nomenclature).

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे. जसे.– साइन (sin), कोसाइन (cos), टॅन्जंट (tan), लाग (log) वगैरे.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा, महाविद्यालये, इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत. जसे.– ऑक्सिजन—प्राणवायु, कॅलरी—ऊष्मांक, sin—ज्या, cos—कोज्या वगैरे. तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. जसे.– cm म्हणजे 'सेंटिमीटर' या संज्ञेचा संक्षेप 'सें. मी.' असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यांवर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारण वापरण्यात येणारे पर्याय तसेच राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत, ते तसेच ठेवावेत. जसे.–मशीन, इंजिन, मीटर, लिटर वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपांत द्यावेत.

८. **मिश्र शब्दांची निर्मिती :**—वैज्ञानिक परिभाषा तयार करताना 'pasteurisation–पाश्चरीकरण', 'voltage — व्होल्टता' अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

* * *

# संक्षेप सूची

| | | | |
|---|---|---|---|
| *abbr.* | abbreviation | अ. व. | अनेकवचन |
| *adj.* | adjective | न. | नपुंसकलिंग |
| *adv.* | adverb | पु. | पुल्लिंग |
| *cf.* | compare | सा. | सामान्य लिंग |
| in comb. | in combination | स्त्री. | स्त्रीलिंग |
| *n.* | noun | | |
| *pl.* | plural | | |
| *v. i.* | verb, intransitive | | |
| *v. t.* | verb, transitive | | |
| *v. t. & i.* | verb, transitive and intransitive | | |

## शास्त्रीय परिभाषेत संकेतचिन्हे म्हणून नेहमी वापरण्यात येणारी

## ग्रीक मुळाक्षरे

| संकेतचिन्हे | | मराठी | संकेतचिन्हे | | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| Α | α | आल्फा | Ν | ν | न्यू |
| Β | β | बीटा | Ξ | ξ | क्साय |
| Γ | γ | गॅमा | Ο | ο | ओमायक्रॉन |
| Δ | δ | डेल्टा | Π | π | पाय |
| Ε | ε | एप्सायलॉन | Ρ | ρ | रो |
| Ζ | ζ | झीटा | Σ | σ | सिग्मा |
| Η | η | ईटा | Τ | τ | टाऊ |
| Θ | θ | थीटा | Υ | υ | यूप्सिलॉन |
| Ι | ι | आयोटा | Φ | φ | फाय |
| Κ | k | काप्पा | Χ | χ | खाय |
| Λ | λ | लॅम्डा | Ψ | ψ | साय |
| Μ | μ | म्यू | Ω | ω | ओमेगा |

# A

$\alpha$**-error,** *n.* (*also* called **rejection error**) $\alpha$-दोष (पु.), आल्फा दोष (पु.)

$\alpha$ **index of Pareto,** पॅरेटोचा $\alpha$ घातांक, पॅरेटोचा आल्फा घातांक

$\alpha\ \beta\ \gamma$ **queue system,** $\alpha\ \beta\ \gamma$ रांग पद्धति
[$\alpha\ \beta\ \gamma$ रांग पद्धतीत प्रत्येक रांग प्रतिमान हे तीन चिन्हांनी दर्शवले जाते. पहिले चिन्ह $\alpha$ हे आदान प्रक्रिया दाखवते, दुसरे $\beta$ सेवा वितरण दाखवते व तिसरे $\gamma$ सेवाकेंद्रांची संख्या दाखवते.]

**Abbe-Helmert criterion,** अॅबे-हेलमर्ट निकष

**abnormal,** *adj.* अपसामान्य

**abnormal curve,** अपसामान्य वक्र
*cf.* complex abnormal curve, जटिल अपसामान्य वक्र

**abnormality,** *n.* अपसामान्यता (स्त्री.)

**abrupt distribution,** त्रुटित वितरण
[संतत वारंवारता वितरणकक्षेच्या परिमित अंतिम बिंदूच्या ठिकाणी, वारंवारता व प्रथम अवकलज शून्य हे दोन्ही नसलेल्या वितरणाला 'त्रुटित वितरण' म्हणतात.]

**abscissa,** *n.* भुज (पु.)

**absolute,** *adj.* १ केवल २ निरपेक्ष ३ परम

**absolute coefficient,** निरपेक्ष गुणक

**absolute deviation,** केवल विचलन

**absolute difference,** केवल अंतर

**absolute error,** केवल दोष

**absolute frequency,** केवल वारंवारता

**absolutely,** *adv.* केवल, निरपेक्ष

**absolutely unbiassed estimator,** १ निरपेक्ष पूर्वग्रहमुक्त आकलक २ निरपेक्ष निरभिनत आकलक

**absolute maximum,** परम महत्तम

**absolute measure,** निरपेक्ष मान

**absolute measurement,** निरपेक्ष मापन

**absolute minimum,** परम लघुतम

**absolute moment,** केवल परिबल

**absolute probabilities,** केवल संभाव्यता

**absolute value,** केवल मूल्य

**absorbing barrier,** शोषक अटकाव

**absorbing Markov chain,** शोषक मार्कोव्ह मालिका

**absorbing region,** शोषक क्षेत्र
[काही योगशील किंवा यादृच्छिक भ्रमण (random walk) प्रक्रमांत कणाच्या एका किंवा अधिक मितींतील भ्रमण क्षेत्रास मर्यादा घातल्यास कण त्या ठिकाणी पोचताच थांबतो. या भ्रमण क्षेत्रास 'शोषक क्षेत्र' असे म्हणतात.]

**absorbing state,** शोषक स्थिति

**absorption probabilities,** शोषण संभाव्यता

**abstract model,** अमूर्त प्रतिमान

**accelerated stochastic approximation,** प्रवेगी प्रसंभाव्यता समीपन

**acceleration by powering,** प्रवेगी घात पद्धति
**acceleration principle,** प्रवेग तत्त्व
**accelerator,** *n.* १ त्वरक (पु.) २ प्रवेगक (पु.)
**acceptable process level,** (*abbr.* APL) स्वीकार्य प्रक्रिया पातळी (स्वीप्रपा)
**acceptable quality level,** (*abbr.* AQL) स्वीकार्य प्रत पातळी (स्वीप्रपा)
**acceptable reliability level,** स्वीकार्य विसंबनीयता पातळी
**acceptance boundary,** (*also* acceptance line) १ स्वीकृति रेषा २ स्वीकरण रेषा, स्वीकरण सीमा, स्वीकरण मर्यादा
**acceptance control chart,** स्वीकृति नियमन आलेख
**acceptance error,** (*also* called $\beta$-error) स्वीकृति दोष
**acceptance inspection,** स्वीकृति परीक्षण
**acceptance line** = **acceptance boundary**
**acceptance number,** १ स्वीकृति संख्या २ स्वीकरण संख्या
**acceptance region,** स्वीकरण क्षेत्र
**acceptance sampling,** स्वीकृति नमुनानिवड
**acceptance sampling by attributes,** गुणानुसारी स्वीकृति नमुनानिवड
**accidental,** *adj.* अभावित
**accidental sampling,** अभावित नमुनानिवड
**accounting price,** (*also* shadow price) छाया किंमत
**accumulated deviation,** संचित विचलन
**accumulated process,** संचित प्रक्रम
**accuracy,** *n.* १ अचूकता (स्त्री.) २ यथार्थता (स्त्री.)
**accurate,** *adj.* १ अचूक २ यथार्थ
**accurately,** *adv.* १ अचूकपणे २ यथार्थपणे
**activity,** *n.* क्रिया (स्त्री.)
**activity analysis,** १ (as, in industry) अर्थ-प्रक्रिया विश्लेषण २ (as, in business management) क्रिया विश्लेषण
**actuarial practice,** विमागणित व्यवसाय
**acyclic network,** अचक्रीय जाळे
**adaptive optimisation,** अनुयोगी इष्टतमीकरण
**adaptive quality control,** अनुयोगी प्रत नियमन
**adaptive search,** अनुकूलक शोध
**add,** *v. t.* १ बेरीज करणे (संख्या वगैरे) २ संकलित करणे (कल्पना वगैरे)
**addition,** *n.* बेरीज (स्त्री.)
**additional,** *adj.* अतिरिक्त
**additional constraint,** अतिरिक्त बंधन *cf.* constraint
**addition of variates,** चलांची बेरीज
**additive,** *adj.* बेरीजयोग्य, बेरजी
**additive algorithm,** बेरीजयोग्य रीत
**additive model,** बेरीजयोग्य प्रतिमान
**additive process,** बेरीजयोग्य प्रक्रम *cf.* differential process, process with independent increments
**additive (random walk) process,** बेरीजयोग्य (यादृच्छिक भ्रमण) प्रक्रम
**additive property of $\chi^2$,** $\chi^2$ चा बेरीजयोग्य गुणधर्म
**additivity,** *n.* बेरीजयोग्यता (स्त्री.)
**additivity axiom,** बेरीजयोग्यता गृहीतक
**additivity of means,** मध्यांची बेरीजयोग्यता
*ad hoc* **enquiry,** तदर्थ चौकशी
*ad infinitum,* अनंतापर्यंत
**adjacent,** *adj.* सन्निध
**adjoining,** *adj.* संलग्न
**adjusted,** *adj.* समायोजित
**adjustment,** *n.* समायोजन (न.)
**admissible,** *adj.* अनुज्ञेय

**admissible decision function,** अनुज्ञेय निर्णय फल

**admissible defects,** (*also* allowable defects) अनुज्ञेय दोष

**admissible hypothesis,** अनुज्ञेय परिकल्पना

**admissible number,** अनुज्ञेय संख्या

**admissible strategy,** अनुज्ञेय डावपेच

**admissible test,** अनुज्ञेय कसोटी

**advanced start,** आगाऊ सुरुवात

**affine $\alpha$ resolvability,** मितिरक्षी $\alpha$ वियोज्यता

**affine resolvable balanced incomplete block design,** मितिरक्षी वियोज्य संतुलित अपूर्ण खंड संकल्पन
[ या वियोज्य संकल्पनात $t+r-1$ इतके उपचार दोन वेगवेगळ्या प्रतिकृतींतील कोणत्याही दोन खंडांमध्ये सामाईक असतात आणि $b=t+r-1$ असेही असते.]

**affinity,** *n.* जवळीक (स्त्री.)

**age dependent birth and death process,** वयावलंबी वृद्धि-क्षय प्रक्रम

**age dependent branching process,** वयावलंबी शाखन प्रक्रम

**age specific death rate,** वयविशिष्ट मृत्युमान

**aggregate,** *n.* समुच्चय (पु.)

**aggregation,** *n.* समुच्चयन (न.)

**aggregation problem,** समुच्चयन समस्या

**aggregative,** *adj.* समुच्चयी

**aggregative index,** समुच्चयी निर्देशांक

**aggregative model,** समुच्चयी प्रतिमान

**Aitken estimator,** आयटकेन आकलक

**Ajne's $A_n$ test,** ॲजने $A_n$ कसोटी

**algebra,** *n.* बीजगणित (न.)

**algebraic,** *adj.* (*also* algebraical) बैजिक

**algebra of events,** घटना बैजिकी

**algorithm,** *n.* रीत (स्त्री.)

**algorithmic convergence,** रीती अभिसरण

**alias,** *n.* समधर्मी (पु.)

**aligned systematic sample,** संरेखित क्रमबद्ध नमुना

**allocation,** *n.* वाटप (न.)

**allocation of a sample,** नमुना वाटप

**allokurtic,** *adj.* अनेककर्तिडी

**allowable defects** = admissible defects

**almost certain,** (*also* almost sure) प्रायः निश्चित, जवळजवळ निश्चित

**almost complementary basis,** प्रायः परिपूरक पायाधार

**almost everywhere,** बव्हंशी सर्वत्र

**almost stationary,** जवळजवळ स्थिर

**almost sure** = almost certain

**almost sure convergence,** प्रायः निश्चित अभिसरण

**almost surely continuous process,** बव्हंशी निश्चित अखंडित प्रक्रम

**alphabet,** *n.* वर्णमाला (स्त्री.) (अवगमशास्त्रातील समष्टी)

**alternate form,** पर्यायी रूप *cf.* parallel form

**alternating renewal process,** एकांतर नवीकरण प्रक्रम

**alternative constraint,** पर्यायी बंधन *cf.* constraint

**alternative hypothesis,** पर्यायी परिकल्पना

**Alter periodogram,** ऑल्टर आवर्तनी आलेख

**ambiguous,** *adj.* संदिग्ध

**amount of information,** अवगम प्रमाण

**amount of inspection,** परीक्षण संख्या

**amplitude,** *n.* दोलविस्तार (पु.) (कमाल विस्तार)

**amplitude ratio,** दोलविस्ताराचे गुणोत्तर

**analogue computer,** सदृश संगणक (पु.)

**analysis,** *n.* विश्लेषण (न.)

**analysis of covariance** = covariance analysis

**analysis of dispersion,** अपस्करण विश्लेषण *cf.* multivariate analysis of variance

analysis of variance = variance analysis
analytic, *adj.* वैश्लेषिक
analytic regression, वैश्लेषिक समाश्रयण
analytic survey, वैश्लेषिक सर्वेक्षण
analytic trend, वैश्लेषिक कल
ancillary, *adj.* सहाय्यभूत
ancillary information, सहाय्यभूत अवगम
ancillary statistic, सहाय्यभूत नमुनाफल
Anderson-Darling statistic, अँडरसन-डार्लिंग नमुनाफल
Anderson's classification statistic, अँडरसन वर्गीकरण नमुनाफल
Andrews' Fourier-type plot, अँड्रयूज फूरिए प्रकारची मांडणी
angle, *n.* कोन (पु.)
angular region, कोनीय क्षेत्र
angular transformation, कोनीय रूपांतरण
animal litters, पिलावळ (स्त्री.)
anisotropic distribution, एकदिक वितरण
annuitant, *n.* वार्षिकीधारक (सा.)
Anosov's theorem, ॲनोसॉव प्रमेय
Ansari-Bradley dispersion test, अन्सारी-ब्रॅडले अपस्करण कसोटी
anti-logarithm, *n.* विलाग (पु.)
antimode, *n.* प्रतिबहुलक (पु.)
antiseries, *n.* व्यस्तश्रेणी (स्त्री.)
antithetic variates, विधर्मी चले
antitonic function, अवरोही फल
antitonic regression function, अवरोही समाश्रयण फल
AOQL, (*abbr.* of average outgoing quality limit) सबप्रसी (सरासरी बहिर्गामी प्रत सीमा)
aperiodic, *adj.* अनावर्तनी
aperiodic state, अनावर्तनी स्थिति
APL, (*abbr.* of acceptable process level) स्वीप्रपा (स्वीकार्य प्रक्रिया पातळी)
a posteriori distribution, (*also* posterior distribution) अनुभवोत्तर वितरण
a posteriori probability, (*also* posterior probability) अनुभवोत्तर संभाव्यता
applied statistics, उपयोजित संख्याशास्त्र
approximate, *adj.* समीप
approximately, *adv.* समीपतेने
approximation, *n.* समीपता (स्त्री.)
approximation error, (error due to approximation) समीपता दोष
a priori distribution, (*also* prior distribution) अनुभवपूर्व वितरण
a priori probability, (*also* prior probability) अनुभवपूर्व संभाव्यता
AQL, (*abbr.* of acceptable quality level) स्वीप्रपा (स्वीकार्य प्रत पातळी)
arbitrarily, *adv.* स्वेच्छेने
arbitrary, *adj.* स्वेच्छ
arbitrary but fixed, कोणताही परंतु निश्चित
arbitrary origin, स्वेच्छ आरंभबिंदु *cf.* working mean
arbitrary probabilities, स्वेच्छ संभाव्यता
arc sine distribution, (*also* inverse sine distribution) व्यस्त ज्या वितरण
arc sine transformation, (*also* inverse sine transformation) व्यस्त ज्या रूपांतरण
area, *n.* १ (a part of region) क्षेत्र (न.) २ (in geometry, measure of extent) क्षेत्रफळ (न.)
area comparability factor, क्षेत्र तुलनीयता गुणक
area sampling, क्षेत्र नमुनानिवड
area statistics, क्षेत्र आकडेवारी
Arfwedson distribution, अर्फवेडसन वितरण
argument, *n.* १ कोनांक (पु.) २ युक्तिवाद (पु.) ३ मूळ चल (पु.)

**ARIMA process,** (*abbr.* of autoregressive integrated moving average process) **स्वसंसम प्रक्रम** (स्वयमाश्रयी संकलित सरकता मध्य प्रक्रम) *cf.* backward process

**arithmetic distribution, गणितश्रेणी वितरण**

**arithmetic mean, गणित मध्य**

**arithmetic probability paper, गणितीय संभाव्यता पत्र**

**ARL,** (*abbr.* of average run length) **सधालां** (सरासरी धाव लांबी)

**Armitage's restricted procedure, अर्मीटेज निर्बंधित कार्यपद्धति**

**array,** *n.* **रचना** (स्त्री.)

**arrayed,** *adj.* **रचलेला**

**arrival distribution, आगमन वितरण**

**artifice,** *n.* **युक्ति** (स्त्री.)

**artificial inbreeding, कृत्रिम अंतर्जनन**

**artificial intelligence, कृत्रिम बुद्धि**

**artificial variable, कृत्रिम चल**

**ascending order, चढता क्रम**

**ascertainment error, कारणनिश्चिति दोष** *cf.* non-sampling error

**ASN,** (*abbr.* of average sample number) **सनसं** (सरासरी नमुना संख्या)

**ASN function,** (*abbr.* of average sample number function) **सनसं फल** (सरासरी नमुना संख्या फल)

**assay,** *n.* **आमापन** (न.)

**assembly line, जुळवणी क्रम**

**assembly-line balancing, जुळवणी क्रम संतुलन**

**assertion,** *n.* **ठाम विधान** (न.)

**assignable causes, निर्देशनीय कारणे**

**assignable variation, निर्देशनीय विचरण**
[ज्या विचरणाचे कारण निश्चित सांगता येते त्याला 'निर्देशनीय विचरण' म्हणतात. उदा. यंत्राची चुकीची ठेवण, वाईट कच्चा माल, कामगारांचे कमी प्रशिक्षण वगैरे.]

**assignment problem, सोपवणी समस्या**

**associable design, सहयोगक्षम संकल्पन**

**associate class, सहयोग वर्ग**
[प्रायोगिक संकल्पनांतील (design of experiments) उपचारांमध्ये (treatments) निरनिराळ्या प्रकारच्या साहचर्य गुण-धर्मांकरिता ही संज्ञा वापरतात. उदा. अंसंअखंसं (PBIBD) मध्ये.]

**association,** *n.* **साहचर्य** (न.) *cf.* colligation

**association scheme, साहचर्य योजना**

**assortative mating,** (*also* called extreme non-random mating) **समगुणी समागम**

**assortment problem, विल्हेवारी समस्या**

**assumed mean, गृहीत मध्य**
[कोणतीही कामचलाऊ किंमत. वितरणाची परिबले सुलभ रीतीने काढण्यासाठी ज्या कामचलाऊ किंमतीचा उपयोग केला जातो तिला 'गृहीत मध्य' म्हणतात. खरे पाहता हा चुकीचा वाक्प्रयोग असून, नवीन आरंभबिंदू (new origin) ही संज्ञा अधिक योग्य आहे.]

**assumption,** *n.* **गृहीत** (न.)

**asymmetrical,** *adj.* **असममित**

**asymmetrical distribution, असममित वितरण**

**asymmetrical factorial design, असममित बहुघटकी संकल्पन**

**asymmetrical test, असममित कसोटी**

**asymmetry,** *n.* **असममिति** (स्त्री.)

**asymptotically,** *adv.* **अनंतवर्ती**

**asymptotically efficient estimator, अनंतवर्ती कार्यक्षम आकलक**

**asymptotically locally optimal design, अनंतवर्ती स्थानिक इष्टतम संकल्पन**

**asymptotically most powerful test, अनंतवर्ती प्रबलतम कसोटी**

asymptotically stationary, अनंतवर्ती स्थिर
asymptotically unbiassed estimator, अनंतवर्ती निरभिनत आकलक
asymptotic Bayes procedure, अनंतवर्ती बेज कार्यपद्धति
asymptotic behaviour of Markov transition probabilities, मार्कोव्ह संक्रमण संभाव्यतांचे अनंतवर्ती वर्तन
asymptotic distribution, अनंतवर्ती वितरण
asymptotic efficiency, अनंतवर्ती कार्यक्षमता
asymptotic Normality, अनंतवर्ती प्रसामान्यता
asymptotic relative efficiency, अनंतवर्ती सापेक्ष कार्यक्षमता
asymptotic standard error, अनंतवर्ती प्रमाण दोष
asymptotic stationarity, अनंतवर्ती स्थैर्यता
attack rate, (*also* incidence rate) आपात प्रमाण
attenuation, *n.* अवगणन (न.)
attenuation correction, अवगणन दुरुस्ती
attribute, *n.* गुण (पु.)
attribute distribution, गुणात्मक वितरण
attributes sampling plan, गुणानुसारी नमुना-निवड योजना
atypical characteristic, अप्रतिरूप लक्षण
auto-catalytic curve, स्वयंप्रेरक वक्र
*cf.* growth curve, वृद्धि वक्र
autocorrelated populations, स्वयंसंबंधित समष्टि
autocorrelation, *n.* स्वयंसंबंध (पु.) (स्वयंसहसंबंध)
autocorrelation coefficient, स्वयंसंबंध गुणक
autocorrelation function, स्वयंसंबंध फल
autocovariance, *n.* स्वयंसहप्रचरण (न.)
autocovariance function, स्वयंसहप्रचरण फल
autocovariance generating function, स्वयंसहप्रचरण जनक फल
autonomous equation, स्वायत्त समीकरण
autonomous expenditure, स्वायत्त खर्च
autoregression, *n.* स्वयमाश्रयण (न.) (स्वयं समाश्रयण)
autoregressive, *adj.* स्वयमाश्रयी
autoregressive integrated moving average process, (*abbr.* ARIMA process) स्वयमाश्रयी संकलित सरकता मध्य प्रक्रम (स्वसंसम प्रक्रम)
autoregressive model, स्वयमाश्रयी प्रतिमान
autoregressive process, स्वयमाश्रयी प्रक्रम
autoregressive series, स्वयमाश्रयी श्रेणी
autoregressive transformation, स्वयमाश्रयी रूपांतरण
auto spectrum, स्वयं मानपंक्ति
auxiliary variable, सहायक चल
average, *n.* १ माध्य (न.) २ (as, in arithmetic mean) सरासरी (स्त्री.)
average amount of inspection, परीक्षण संख्या माध्य
average article run length, सरासरी वस्तु धाव संख्या
average-backlog penalty cost, सरासरी अपूर्त-दंड परिव्यय
average corrections (for grouping), गटज दोष सुधार माध्य
average critical value method, सरासरी निर्णयन मूल्य पद्धति
average deviation, विचलन माध्य
average extra defectives limit, सरासरी जादा सदोष वस्तु सीमा
average fraction of produce units passed under sampling, नमुनानिवडीनुसार संमत केलेल्या उत्पादित एककांचे सरासरी प्रमाण
average inaccuracy, सरासरी अयथार्थता

**average of relatives,** १ सापेक्ष मूल्यांचे माध्य २ सापेक्ष मूल्यांची सरासरी

**average outgoing quality level,** सरासरी बहिर्गामी प्रत पातळी

**average outgoing quality limit,** (*abbr*. AOQL) सरासरी बहिर्गामी प्रत सीमा (सबप्रसी)

**average overall possible samples,** एकूण संभाव्य नमुन्यांची सरासरी

**average quality protection,** सरासरी प्रत रक्षण

**average return per period,** प्रति अवधि सरासरी प्रत्याय

**average run length,** (*abbr*. ARL) सरासरी धाव लांबी (सधालां)

**average sample number,** (*abbr*. ASN) सरासरी नमुना संख्या (सनसं)

**average sample number curve,** सरासरी नमुना संख्या वक्र

**average sample number function,** (*abbr*. ASN function) सरासरी नमुना संख्या फल (सनसं फल)

**average sample run length,** सरासरी नमुना धाव लांबी

**average value problem,** सरासरी मूल्य समस्या

**axial distribution,** अक्षीय वितरण

**axiom,** *n*. गृहीतक (न.)

**axiomatically,** *adv*. गृहीतकरीत्या

**axonometric chart,** घनचित्र (न.)

# B

β-error, *n.* (*also* called acceptance error) β-दोष (पु.), बीटा दोष (पु.)
**Bachelier process,** बॅचलिअर प्रक्रम
**back tracting,** प्रत्यागमन (न.)
**backward equation,** पश्चग समीकरण
**backward induction,** पश्चग विगमन
**backward in time,** कालत: पश्चग
**backward process,** पश्चग प्रक्रम
*cf.* ARIMA process, स्वसंसम प्रक्रम
**Bagai's $Y_1$ statistic,** बगाई $Y_1$ नमुनाफल
**Bahadur efficiency,** बहादूर कार्यक्षमता
**Baire function,** बेअर फल
**Baire function of a system of random variables,** यादृच्छिक चलमालेचे बेअर फल
**balanced,** *adj.* समतोल, संतुलित
**balanced confounding,** समतोल संकुलन
**balanced design,** संतुलित संकल्पन
**balanced difference,** संतुलित अंतर
**balanced factorial experimental design,** संतुलित बहुवटकी प्रायोगिक संकल्पन
**balanced incomplete block,** संतुलित अपूर्ण खंड, समतोल अपूर्ण खंड
**balanced incomplete block design,** (*abbr.* BIBD) संतुलित अपूर्ण खंड संकल्पन (संअखंसं)
**balanced lattice square,** संतुलित जालक चौरस
**balanced sample,** संतुलित नमुना
**ballot theory,** गुप्त मत संभाव्यता सिद्धांत
**band chart,** पट्टा आलेख
**BAN estimator,** (*abbr.* of best asymptotically Normal estimator) उअप्र आकलक (उत्तम अनंतवर्ती प्रसामान्य आकलक)
**bank management problems,** बँक व्यवस्थापन समस्या
**bar,** *n.* १ (as, in $\bar{x}$) बार (पु.) २ दंडिका (स्त्री.)
**bar chart,** (*also* bar diagram) दंडिकाकृति (स्त्री.)
**barometric,** *adj.* परिवर्तनमापी
**Bartholomew's problem,** बार्थोलोम्यू समस्या
**Bartlett and Diananda test,** बार्टलेट आणि डायनंडा कसोटी
**Bartlett relation,** बार्टलेट संबंध
**Bartlett's collinearity test,** बार्टलेट एक-रेषीयता कसोटी
**Bartlett's decomposition,** बार्टलेट विघटन
**Bartlett's test,** बार्टलेट कसोटी
**Bartlett's test of second-order interaction,** बार्टलेट द्विकोटिका आंतरक्रिया कसोटी
**basal age,** किमान मर्यादा वय
**base,** *n.* आधार (पु.)
**base line,** आधार रेषा
**base period,** आधार काल *cf.* current period

**base reversal test,** (*also* **time reversal test**) **आधार व्युत्क्रमण कसोटी**
**bases for projection, प्रक्षेपण आधार**
**base shifting, आधार बदल**
**base weight, आधारकालीन भार**
**base year, आधारभूत वर्ष** *cf.* current period
**basic,** *adj.* **१ मूलभूत २ पायाभूत**
**basic cell, मूलभूत घटक**
**basic solution, पायाभूत उकल**
**basic variable, पायाभूत चल**
**basis,** *n.* **पायाधार** (पु.)
**basis of vector space, सदिश अवकाश पायाधार**
**Basu's theorem, बसू प्रमेय**
**batch,** *n.* **गट** (पु.) *cf.* lot
**batch ordering, गट मागणी**
**batch service problem, गट सेवा समस्या**
**batch size model, गट आकार प्रतिमान**
**batch variation, गट विचरण**
**Bates-Neyman model, बेट्स-नेमन प्रतिमान**
**battery of tests, कसोटी मालिका**
**Baule's equation, बोले समीकरण**
**Bayes' decision rule, बेज निर्णय नियम**
**Bayes' estimation, बेज आकलन**
**Bayesian analysis, बेजीय विश्लेषण**
**Bayesian confidence intervals, बेजीय विश्वास अंतराळे**
**Bayesian estimate, बेजीय आकल**
**Bayesian inference, बेजीय अनुमान**
[बेजच्या प्रमेयाचा उपयोग करून काढलेले अनुमान. प्राचले ही अनुभवपूर्व वितरणे (prior distributions) असलेली यादृच्छिक चले आहेत असे यात मानले जाते.]
**Bayesian intervals, बेजीय अंतराळे**
**Bayesian probability point, बेजीय संभाव्यता बिंदु**
**Bayes' postulate, बेज आधारतत्त्व**
**Bayes' risk, बेज जोखीम**
**Bayes' solution, बेज उकल**
[सांख्यिकी निर्णय फलाबाबत 'बेज' ची उकल म्हणजे एखाद्या संभाव्यता वितरणाबाबत सरासरी जोखीम (average risk) कमीत कमी करणारे निर्णय फल.]
**Bayes' strategy, बेज डावपेच**
**Bayes' theorem, बेज प्रमेय**
**Beale-cycling example, बील चक्रीय उदाहरण**
**Beall-Rescia generalisation of Neyman's distribution, नेमन वितरणाचे बील-रेसियाचे व्यापकीकरण**
**Bechhofer's indifference zone method, बेछॉफर तटस्थ क्षेत्र पद्धति**
**behavioural decision function, वर्तनी निर्णय फल**
**behaviour strategy, वर्तनी डावपेच**
**Behrens-Fisher test,** (*also* called **Fisher–Behrens test**) **बेहेरेन्स-फिशर कसोटी**
**Behrens' method,** (*also* called **Dragstedt-Behrens' method**) **बेहेरेन्स पद्धति**
**Bellman-Harris process, बेलमन-हॅरिस प्रक्रम**
**Bellman's principle of optimality, बेलमन इष्टतमता तत्त्व**
**bell-shaped,** *adj.* **घंटाकार**
**bell-shaped curve, घंटाकार वक्र**
**belt graph, पट्टालेख** (पु.)
**Beran's tests, बेरान कसोट्या**
**Berge's inequality, बर्ज असमानता**
**Berksonian line, बर्कसनीय रेषा**
**Bernoulli distribution, बर्नूली वितरण** *cf.* point binomial distribution
**Bernoulli number, बर्नूली संख्या**
**Bernoulli polynomial, बर्नूली बहुघाती राशि**
**Bernoulli's theorem, बर्नूली प्रमेय**
**Bernoulli trials, बर्नूली प्रयत्न**
**Bernoulli variation, बर्नूली प्रचरण**

Bernoulli walk, बर्नूली भ्रमण
Bernstein's inequality, बर्नस्टाइन असमानता
Bessel function distribution, बेसेल फल वितरण
Bessel's correction, बेसेल सुधार
best acceptance region, उत्तम स्वीकरण क्षेत्र
best asymptotically Normal estimator, (*abbr.* BAN estimator) उत्तम अनंतवर्ती प्रसामान्य आकलक (उअप्र आकलक)
best critical region, उत्तम निर्णयन क्षेत्र
best estimator, उत्तम आकलक
best fit, उत्तम अन्वायोजन
best linear minimum bias estimation, (*abbr.* BLIMBE) उत्तम एकघाती किमान अभिनति आकलन (उएकिअआ)
best linear unbiassed estimate, (*abbr.* BLUE) उत्तम एकघाती निरभिनत आकल (उएनिआ)
best predictor, उत्तम अंदाजक
best rejection region, (as, in function) उत्तम त्यजन क्षेत्र
best strategy, उत्तम डावपेच
best unbiassed estimate, उत्तम निरभिनत आकल
bet, *n.* पैज (स्त्री.), होड (स्त्री.)
beta coefficients, बीटा गुणांक
beta distribution, बीटा वितरण
beta distribution of the second kind, दुसऱ्या प्रकारचे बीटा वितरण *cf.* inverted beta distribution
beta probability plot, बीटा संभाव्यता आलेख
better, *n.* (*also* bettor) पैजकार (सा.)
better same order bias estimator, सरस समकोटिका अभिनति आकलक
bettor = better
between class variance, (*also* interclass variance) आंतरवर्ग प्रचरण
between effects, आंतर परिणाम
between-groups variance, आंतर-गट प्रचरण
between sum of squares, आंतर वर्गबेरीज
Bhattacharyya bounds, भट्टाचार्य बंध
Bhattacharyya's distance, भट्टाचार्य अंतर
bias, *n.* १ पूर्वग्रह (पु.) २ अभिनति (स्त्री.)
biassed, *adj.* १ पूर्वग्रहयुक्त २ अभिनत
biassed estimator, अभिनत आकलक
biassed sample, अभिनत नमुना
biassed sampling, १ पूर्वग्रहयुक्त नमुनानिवड २ अभिनत नमुनानिवड
biassed test, अभिनत कसोटी
BIBD, (*abbr.* of balanced incomplete block design) संअखंसं (संतुलित अपूर्ण खंड संकल्पन)
Bickel-Hodges estimator, (*also* called folded median) बिकल-होजेस आकलक
Bienaymé Tchebychev inequality, बीनेम शेबिशेव असमानता
bifactor model, द्विघटकी प्रतिमान
big M method, मोठा M पद्धति
bilateral exponential distribution, उभयपक्षी घातांकी वितरण
bilateral monopoly, उभयपक्षी मक्तेदारी, उभयपक्षी एकाधिकार
bimodal, *adj.* द्विबहुलक
bimodal distribution, द्विबहुलक वितरण
binary digit, (*also* bit) द्वि-अंक (पु.)
binary experiment, द्विमान प्रयोग
binary representation, द्विमान रूपण
binary sequence, द्विमान क्रम
Bingham's distribution, बिंगहॅम वितरण
binomial, *adj.* द्विपदी, द्विपद–
binomial coefficient, द्विपदी गुणांक
binomial distribution, द्विपदी वितरण
binomial expansion, द्विपदी विस्तार

**binomial index of dispersion,** अपस्करणाचा द्विपद निर्देशांक

**binomial probability paper,** द्विपद संभाव्यता पत्र

**binomial variation,** द्विपद विचरण

**binomial waiting time distribution,** द्विपदी प्रतीक्षा अवधि वितरण *cf.* negative binomial distribution
[ ऋण द्विपदी वितरणाचे वैकल्पिक नाव. निरवलंबी द्विपद प्रयत्नांच्या मालिकेत '$k+x-1$ प्रयत्नांनंतरच्या प्रयत्नात $k$ वी सफलता मिळणे' या घटनेची संभाव्यता या वितरणाने मिळते.]

**biometrics,** *n.* जीवसंख्याशास्त्र (न.)

**biometry,** *n.* १ जीवमिति (स्त्री.) २ जीव-संख्याशास्त्र (न.)

**bipartite graph,** (*also* called **bipartite network**) द्विभागी आलेख

**bipartite network,** (*also* called **bipartite graph**) द्विभागी जाळे

**bipartition,** *n.* द्विभाजन (न.)

**bipolar factor,** द्विध्रुवी घटक

**bipolykays,** द्विचल बहु '*k*' नमुनाफल
[हुकने (१९५६) दिलेल्या बहु $k$ नमुना-फलातील (polykays) कल्पनांचे विस्तारण.]

**Birnbaum-Raymond-Zuckerman inequality,** बर्नबॉम-रेमंड-झुकरमन असमानता

**Birnbaum-Saunders distribution,** बर्नबॉम सॉन्डर्स वितरण

**Birnbaum's inequality,** बर्नबॉम असमानता

**Birnbaum–Tingey distribution,** बर्नबॉम-टिंगी वितरण

**birth and death process,** वृद्धि-क्षय प्रक्रम

**birth, death and immigration process,** वृद्धिक्षय व आप्रवास प्रक्रम

**birth process,** वृद्धि प्रक्रम

**birth rate,** (as, in demography) जनन प्रमाण

**bisector,** *n.* दुभाजक (सा.)

**biserial correlation,** द्विश्रेणिक सहसंबंध

**bispectrum,** *n.* द्विमानपंक्ति (स्त्री.)

**Bissinger distributions,** बिसिंजर वितरणे

**bit** = binary digit

**bivariate,** *n.* द्विचल (पु.)

**bivariate binomial distribution,** द्विचल द्विपदी वितरण

**bivariate Cauchy distribution,** द्विचल कोशी वितरण

**bivariate distribution,** द्विचल वितरण

**bivariate logarithmic distribution,** द्विचल लागीय वितरण

**bivariate logarithmic series distribution,** द्विचल लागीय श्रेणी वितरण

**bivariate multinomial distribution,** द्विचल बहुलपदी वितरण

**bivariate negative binomial distribution,** द्विचल ऋण द्विपदी वितरण

**bivariate Normal distribution,** द्विचल प्रसामान्य वितरण

**bivariate Pareto distribution,** द्विचल पॅरेटो वितरण

**bivariate Pascal distribution,** द्विचल पास्कल वितरण

**bivariate sign test,** द्विचल चिन्ह कसोटी

**bivector multinomial distribution,** द्विसदिश बहुलपदी वितरण

**Blackwell's theorem,** ब्लॅकवेल प्रमेय

**Blakeman's criterion,** ब्लेकमन निकष

**blank table,** निरंक सारणी, निरंक कोष्टक

**BLIMBE,** (*abbr*. of best linear minimum bias estimation) उएकिअआ (उत्तम एकघाती किमान अभिनति आकलन)

**block,** *n.* (as, in design of experiment) १ गट (पु.) २ खंड (पु.)

**block diagram,** स्तंभाकृति (स्त्री.)

**block intersection,** खंड-आंतर छेद

**Blom's method,** ब्लोम पद्धति

**BLUE,** (*abbr.* of best linear unbiassed estimate) उएनिआ (उत्तम एकघाती निरभिनत आकल)

**Blum approximation,** ब्लम समीपन

**Blum-Kiefer-Rosenblatt independence test,** ब्लम-किफेर-रोझेनब्लट निरवलंबन कसोटी

**Bochner's theorem,** बॉकनेर प्रमेय

**Bock's three component model,** बॉक तीन अवयवी प्रतिमान

**Bonferroni inequality,** बॉनफेरोनी असमानता

**Boole-Bonferroni Fréchet inequality,** बूल-बॉनफेरोनी-फ्रेचेट असमानता

**Boole's inequality,** बूल असमानता

**Borel-Cantelli lemmas,** बोरेल-कॅन्टेली सहायक-प्रमेये

[ही दोन सहायक प्रमेये आहेत. त्यांचा उपयोग बृहत संख्या नियमांच्या (laws of large numbers) सिद्धतेकरिता होतो. पहिले असे : जर $A_1, A_2, \ldots, A_n$ या घटनाश्रेणीच्या संभाव्यता $p_1, p_2, \ldots\ldots, p_n$ अशा असतील आणि $\sum_{i=1}^{\infty} p_i$ ही वेरीज अभिसारित (convergent) असेल तर एखाद्या क्षणानंतर निश्चितपणे घडणाऱ्या घटना सांत असतील. दुसरे असे : जर, या घटना निरवलंबी असतील आणि $\sum_{i=1}^{\infty} p_i$ ही वेरीज अपसारित (divergent) असेल तर निश्चितपणे घडणाऱ्या घटना अनंत असतील.]

**Borel cylinder in function space,** फल अवकाशातील बोरेल चितिसंच

**Borel field,** बोरेल क्षेत्र

**Borel set in an infinite dimensional space,** अनंतमिति अवकाशातील बोरेल संच

**Borel-Tanner distribution,** बोरेल-टॅनर वितरण

**Borges' approximation,** बोर्जेस समीपन

**borrowing rate,** कर्ज घेण्याचा दर

**Bose distribution,** बोस वितरण

**Bose-Einstein statistics,** बोस-आइन्स्टाइन संविभाजन

**bottleneck production line assignment problem,** गतिरोधी उत्पादनक्रम सोपवणी समस्या

**boundary,** *n.* मर्यादा (स्त्री.)

**boundary condition,** मर्यादा शर्त

**bounded,** *adj.* परिबद्ध

**bounded completeness,** परिबद्ध संपूर्णता

**bounded variable,** परिबद्ध चल

**Bowley index,** बॉवले निर्देशांक

**Box-Jenkins model,** बॉक्स-जेन्किन्स प्रतिमान

**Box's test,** बॉक्स कसोटी

**Bradford distribution,** ब्रॅडफोर्ड वितरण

**Bradley-Terry model,** ब्रॅडले-टेरी प्रतिमान

**branch and bound algorithm,** शाखा-बंध रीत

**branch and prune,** शाखन-छाटणी (स्त्री.)

**branching Markov process,** शाखन मार्कोव्ह प्रक्रम

[यादृच्छिक प्रक्रमामध्ये समष्टीतील घटकांमधून नवीन घटक निर्माण होऊन समष्टीची वृद्धी होते. या प्रक्रमात एखाद्या विशिष्ट स्थितीत प्रतीक्षा काळाचे वितरण हे ऋण घातांकी असल्यास त्या प्रक्रमास 'शाखन मार्कोव्ह प्रक्रम' म्हणतात.]

**branching Poisson process,** शाखन प्वॉसाँ प्रक्रम

[प्वॉसाँ समूहन प्रक्रम (Poisson clustering process) या संज्ञेऐवजी वरील संज्ञा Lewis (१९६४) ने सुचवली. ज्या मूळ प्वॉसाँ प्रक्रमात प्रत्येक घटनेनंतर व मुख्य प्वॉसाँ

प्रक्रमातील घटनेपूर्वी सहयोगी (associated) घटनांची क्रमिका (sequence) येते त्याला 'शाखन प्वॉसॉं प्रक्रम' म्हणतात. यातील सहयोगी घटनांची क्रमिका हा स्वतःच प्वॉसॉं नसू शकणारा (not necessarily) एक दुय्यम (subsidiary) प्रक्रम असतो. संमिश्र (complex) प्वॉसॉं प्रक्रमाचा अंतर्भाव करण्याकरिता बार्टलेटने (१९६३) ही संज्ञा सुचवली आहे.]

**branching process,** (*also* **multiplicative process**) शाखा प्रक्रम

**branching renewal process,** शाखन नवीकरण प्रक्रम

**Brandt-Snedecor method,** ब्रॅन्ट-स्नेडेकर पद्धति

**Bravais correlation coefficient,** ब्रवे सहसंबंध गुणांक

**breakdown bound,** क्षमताभंग मर्यादा

**breakeven point,** संबिंदु (पु.)

**breakthrough,** *n.* पारवेधन (न.)

**bridge and poker,** ब्रिज व पोकर

**Brownian motion process,** ब्राऊन संचार प्रक्रम

**Brown-Mood procedure,** ब्राऊन-मूड कार्यपद्धति

**Brown's method,** ब्राऊन पद्धति

**Bruceton method,** ब्रुस्टन पद्धति

**Brunk's test,** ब्रंक कसोटी

**budget constraint,** खर्चबंधन (न.) *cf.* constraint

**buffer stock,** १ (as, in inventory model) राखीव साठा २ (as, in transshipment model) गरजी साठा

**bulk queues,** ठोक रांगा

**bulk sampling,** ठोक नमुनानिवड

**bunch-map analysis,** गुच्छ-चित्र विश्लेषण *cf.* confluence analysis

**Burkholder approximation,** बर्कहोल्डर समीपन

**Burr's distribution,** बर्र वितरण

**business cycle,** व्यापार चक्र, तेजीमंदीचे चक्र

**business game,** व्यापार खेळ

**busy period,** कार्यमग्नता अवधि

**busy probability,** कार्यमग्नता संभाव्यता

**Buys-Ballot table,** बाइस-बॅलट रचना

वितरण-निरपेक्ष अनुमान किंवा कसोट्या यांना उद्देशून कधीकधी प्राचल-निरपेक्ष हा शब्द वापरतात पण हा वापर गोंधळात टाकणारा असल्याने टाळावा. ज्या परिकल्पनांत प्राचलाविषयी ठाम विधान केलेले नसते अशाच परिकल्पनांच्या वर्णनात 'प्राचल-निरपेक्ष' हा शब्द वापरणे अधिक चांगले.]

**distribution-free sufficiency, वितरणमुक्त पर्याप्तता**

**distribution function = cumulative frequency (probability) function**

**distribution of effect problem, प्रयास वितरण समस्या**

**distribution of exceedances, आधिक्य वितरण**

**distribution of run lengths, मालिका लांबी वितरण**

**disturbance function, विक्षोभ फल**

**disturbed harmonic process, विक्षोभित संवादी प्रक्रम**

**disturbed oscillation, विक्षोभित दोलन**

**diverge,** *v.t. & i.* **अपसृत होणे, अपसृत करणे**

**divergence,** *n.* **अपसृति (स्त्री.), अपसरण (न.)**

**divergent birth process, अपसारी वृध्दि प्रक्रम**

**dividing value, विभाजन मूल्य**

[ $a_1, a_2, \ldots\ldots, a_k, \ldots\ldots, a_n$ ही एक न उतरती (non-decreasing) क्रमिका आहे. जर

$$\sum_{i=1}^{k-1} a_i + a_k' = \sum_{i=k+1}^{n} a_i + a_k''$$ आणि

$a_k = a_k'$ असतील तर $a_k$ ला $a_1, a_2, \ldots$ चे विभाजन मूल्य म्हणतात.

$$\sum_{i=1}^{k} a_i = \sum_{i=k+1}^{n} a_i$$ असल्यास $a_k$ व $a_{k+1}$ यामधील कोणतेही मूल्य हे विभाजन मूल्य समजले जाईल. ]

**Divisia-Roy index, डीव्हिसिया-रॉय निर्देशांक**

**Divisia's index, डीव्हिसिया निर्देशांक**

**divisibility axiom, विभाज्यता गृहीतक**

**Dixon's statistic, डीक्सन नमुनाफल**

**Dodge continuous sampling plan, डॉज संतत नमुनानिवड योजना**

**Dodge-Romig sampling inspection table, डॉज-रोमिग नमुनानिवड परीक्षण कोष्टक**

**Dodge-Romig table, डॉज-रोमिग कोष्टक**

**domain,** *n.* **अधिक्षेत्र (न.)**

*cf.* range, **कक्षा**

**domain of attraction, आकर्षण अभिक्षेत्र**

**domain of study, अभ्यास क्षेत्र**

**dominant,** *adj.* (as, in theory of games) **वरचढ, सरस, प्रभावी**

**dominant root, प्रभावी मूळ**

**dominated convergence theorem, प्रभावित अभिसरण प्रमेय**

**dominating,** *adj.* (as, in theory of games) **वरचढ, सरस**

**dominating convergence theorem, वरचढ अभिसरण प्रमेय**

**dominating strategy, सरस डावपेच**

**domination,** *n.* (as, in theory of games) **प्रभाव (पु.) वर्चस्व (न.)**

**Donsker's theorem,** (*also* called **functional central limit theorem) डॉन्स्कर प्रमेय**

**Doolittle method, डूलिटल पद्धति**

**Doolittle technique, डूलिटल तंत्र**

**dose metameter, मात्रारूपांतरित मूल्य** *cf.* response metameter

**double binomial distribution, दुहेरी द्विपद वितरण**

**double confounding, दुहेरी संकुलन**

**double decrement table, द्विघट कोष्टक**

**double dichotomy, दुहेरी द्वंद्वभाजन**

**double exponential distribution,** दुहेरी घातांकी वितरण

**double exponential regression,** दुहेरी घातांकी समाश्रयण

**double hypergeometric distribution,** दुहेरी अतिगुणोत्तरीय वितरण

**double logarithmic chart,** दुहेरी लागीय आलेखपत्र

**double Pareto curve,** पॅरेटो बेरीज़ वक्र

**double Poisson distribution,** दुहेरी प्वॉसाँ वितरण

**double-ratio estimator,** दुहेरी गुणोत्तर आकलक

**double reversal design,** दुहेरी व्युत्क्रमण संकल्पन

**double sampling,** १ (as, in sampling theory) नमुना उप-नमुना निवड २ (as, in statistical quality control) दुबार नमुनानिवड *cf.* single sampling

**double starred,** (as, in test of significance) द्वितारांकित

**doublet,** *n.* द्विक (न.)

**double tailed test,** (*also* two sided test *or* two tailed test) उभय पुच्छ कसोटी

**doubly noncentral F–distribution,** दुहेरी अकेंद्रीय F–वितरण

**doubly occupied,** दुहेरी व्याप्त

**doubly stochastic,** दुहेरी प्रसंभाव्य

**doubly stochastic matrix,** दुहेरी प्रसंभाव्य सारणी

**doubly stochastic Poisson process,** दुहेरी यादृच्छिक प्वॉसाँ प्रक्रम

**doubly truncated Normal distribution,** दुहेरी छेदित प्रसामान्य वितरण

**down-cross,** *n.* अवलंघन बिंदु (पु.)

**downward bias,** ऋण अभिनति

**Dragstedt-Behrens' method,** (*also* called Behrens' method) ड्रॅग्स्टेट-बेहरेन्स पद्धति

**draw,** *n.* (as, in sampling) ओढ (स्त्री.)

**drawing,** *n.* (as, in sampling) ओढत (स्त्री.)

**$D^2$ statistic,** $D^2$ नमुनाफल

**dual feasible,** (as, in linear programming) अन्योन्य शक्य

**duality,** *n.* अन्योन्यता (स्त्री.)

**dual prices,** अन्योन्य किंमती

**dual problem,** अन्योन्य समस्या, प्रतिबिंब समस्या

**dual process,** अन्योन्य प्रक्रम

**dual theorem,** अन्योन्य प्रमेय

**dual variable,** अन्योन्य चल

**dummy,** *n.* १ अक्रिय (न.) २ कल्पित (न.)

**dummy observation,** कल्पित मूल्य

**dummy process,** अक्रिय प्रक्रम

**dummy treatment** = control treatment

**dummy variable,** कल्पित चल

**Duncan's test,** डंकन कसोटी

**duopoly,** *n.* द्वयाधिकार (पु.)

**duo-trio test,** द्वि-त्रि कसोटी *cf.* triangle test, त्रिकुटी कसोटी [या कसोटीत तीन वस्तूंपैकी दोन सारख्या असतात व तिसरी वेगळी असते. या तिन्ही वस्तू परीक्षकांस देतात. परीक्षक त्यांतील तिसरी (वेगळी) वस्तू, सारख्या वस्तूंच्या दिलेल्या गुणधर्मावरून ओळखण्याचा प्रयत्न करतो.]

**duplicated sample,** द्विरुक्त नमुना

**duplicate sample,** प्रति नमुना

**duplicating technique,** दुहेरी तंत्र

**duplication,** *n.* द्विरुक्ति (स्त्री.)

**duration,** *n.* अवधि (पु.)

**Durbin's multistage variance estimator,** डर्बिन बहुटप्पी प्रचरण आकलक

**Durbin-Watson statistic, डर्बिन-वॉटसन नमुनाफल**

**Dvoretsky's stochastic approximation theorem, व्होरेट्स्की यादृच्छिक समीपन प्रमेय**

[अध्यारोपित यादृच्छिक दोष रूपांतरणाच्या अभिसरणाविषयीचे सर्वसाधारण प्रमेय.हे प्रमेय रॉबिन्स-मन्रो आणि कीफर-वुल्फोविट्झ यांच्या यादृच्छिक समीपन पद्धतींत वापरतात.]

**Dvoretsky's theorem, व्होरेट्स्की प्रमेय**

**Dwass-Steel test, डॉस-स्टील कसोटी**

**dynamic control system, गतिक नियंत्रण पद्धति**

**dynamic lot-size model, गतिक गठ्ठा-आकार प्रतिमान**

**dynamic model, गतिक प्रतिमान**

*cf.* multi-temporal model, भिन्नकालिक प्रतिमान

unitemporal model, कालनिरपेक्ष प्रतिमान

[अर्थमितिशास्त्रातील प्रतिमानात पुढीलपैकी एक किंवा दोनही गुणधर्म असले तर त्याला 'गतिक प्रतिमान' म्हणतात : (१) संरचनात्मक समीकरणांतील निदान एका चलाची मूल्ये वेगवेगळ्या कालबिंदूंची असतात किंवा त्या मूल्यांची एक कालक्रमिका बनते; (२) निदान एका समीकरणात कालाचे फल असते.

जर पहिला गुणधर्म असला तर अशा प्रणालीला कधीकधी भिन्नकालिक प्रतिमान म्हणतात व एकही गुणधर्म नसला, तर कालनिरपेक्ष प्रतिमान म्हणतात.]

**dynamic monetary model, गतिक द्रव्यविषयक प्रतिमान**

**dynamic multiplier model, गतिक गुणक प्रतिमान**

**dynamic phenomenon, गतिक दृकघटना**

**dynamic planning, गतिक नियोजन**

**dynamic programming, गतिक प्रायोजन**

**dynamic stochastic process, गतिक यादृच्छिक प्रक्रम**

**dynamic system, गतिक पद्धति**

**dynamised model, गतिदत्त प्रतिमान**

# E

ε-independence, *n.* ε-निरवलंबन (न.)

earliest finishing time, (*abbr.* EFT) लवकरात लवकर संपण्याची वेळ (लसंवे)

earliest starting time, (*abbr.* EST) लवकरात लवकर सुरू करण्याची वेळ (लसुवे)

echo effect, प्रतिध्वनि परिणाम

ecologist, *n.* पारिस्थितिकी तज्ञ (सा.)

ecology, *n.* पारिस्थितिकी (स्त्री.)

econometrics, *n.* अर्थमितिशास्त्र (न.)

econometry, *n.* अर्थमिति (स्त्री.)

economic batch size, किफायती गट आकार

economic lot size, किफायती गठ्ठा आकार

economic model, अर्थशास्त्रीय प्रतिमान

economic order quantity, (*abbr.* EOQ) किफायती मागणी नगसंख्या (किमान)

economic order quantity problem, (*abbr.* EOQ problem) किफायती मागणी नगसंख्या समस्या (किमान समस्या)

Edgeworth index, एजवर्थ निर्देशांक

$$\left[\frac{\Sigma p_1\,(q_0+q_1)}{\Sigma p_0\,(q_0+q_1)}\right]$$

Edgeworth's series, एजवर्थ श्रेणी

educational age norm, शैक्षणिक वय प्रमाणक

educational quotient, शैक्षणिक गुणांक

effective dose, प्रभावी मात्रा

effective range, परिणामी कक्षा

effective reproduction rate, परिणामी प्रजनन प्रमाण

(पहा : net reproduction rate)

effective unit, परिणामी एकक

effect variable, कार्य चल

efficiency, *n.* कार्यक्षमता (स्त्री.)

[वितरणाच्या प्राचलाचा एक आकलक दुसऱ्या आकलकापेक्षा अधिक कार्यक्षम असू शकतो. ही कार्यक्षमता मोजण्याकरिता त्यांच्या प्रचरणांच्या गुणोत्तरांचा उपयोग करतात. या दोहोंपैकी कमीत कमी प्रचरण असलेला आकलक समजा t आहे व दुसरा $t_1$ आहे. t चे प्रचरण $v$ आणि $t_1$ चे प्रचरण $v_1$ असेल तर, t हा $t_1$ पेक्षा अधिक कार्यक्षम आहे. जर $v$ हे लघुतम प्रचरण असेल तर, $t_1$ ची कार्यक्षमता ही $v/v_1$ ने मोजली जाते.

हीच संज्ञा प्रायोगिक संकल्पनाच्या (experimental design) गुणधर्माबाबतही वापरली जाते. सारख्याच नेमकेपणाच्या (precision) दोन संकल्पनांपैकी ज्याला दुसऱ्यापेक्षा कमी वेळ आणि कमी खर्च लागतो त्या संकल्पनाला अधिक कार्यक्षम संकल्पन म्हणतात.]

efficiency equivalence, कार्यक्षमता समतुल्यता

efficiency factor, क्षमतांक (पु.)

**efficiency index,** कार्यक्षमता निर्देशांक

**efficient allocation,** कार्यक्षम वाटप

**efficient estimator,** कार्यक्षम आकलक

**EFT,** (*abbr.* of earliest finishing time) लसंवे (लवकरात लवकर संपण्याची वेळ)

**Ehrenfest model,** एरेनफेस्ट प्रतिमान

**eigenvalue,** *n.* (*also* called characteristic root *or* latent root) उचित मूल्य (न.)

**eigen vector,** (*also* latent vector) उचित सदिश

**elapsed time,** लोटलेला अवधि *cf.* residual time

[नवीकरण प्रक्रमात कोणत्याही दोन लगतच्या नवीकरण बिंदूतील कालावधीस 'लोटलेला अवधी' म्हणतात.]

**elastic barrier,** लवचिक अटकाव

**elasticity,** *n.* लवचिकता (स्त्री.)

**element,** *n.* घटक (पु.)

**elementary contrast,** प्राथमिक भेद

**elementary renewal theorem,** प्राथमिक नवीकरण प्रमेय

**elementary unit,** मूलभूत एकक

**Elfving distribution,** एल्फविंग वितरण

**ellipse of concentration,** संकेंद्रण दीर्घवृत्त

**ellipsoidal Normal distribution,** विवृत्ताभी प्रसामान्य वितरण

**elliptically symmetric distributions,** विवृत्ततः सममित वितरणे

**elliptical Normal distribution,** विवृत्तीय प्रसामान्य वितरण

**elliptical truncation,** विवृत्तीय छेदन

**ellipticity,** *n.* विवृत्तता (स्त्री.)

**emigration,** *n.* उत्प्रवास (पु.)

**empirical,** *adj.* अनुभवजन्य

**empirical Bayes' estimator,** बेज अनुभवजन्य आकलक

**empirical Bayes' procedure,** बेज अनुभवजन्य कार्यपद्धति

**empirical distribution function,** अनुभवजन्य वितरण फल

**empirical probit,** अनुभवजन्य प्रसामान्यक

**empty cell test,** रिक्त घट कसोटी

**emulsion,** *n.* पायस (पु.)

**end corrections,** उभयाग्र समायोजने

**endogenous variate,** अंतर्जात चल

**end point solution,** टोक बिंदु उकल

**Engset distribution,** छेदित द्विपदी वितरण

[दाटी सिद्धांतात या वितरणाचा आढळ होतो. उच्च मूल्यांपाशी छेदलेल्या द्विपदी वितरणाशी ते सममूल्य आहे.

$$Pr(x) = \frac{\binom{n}{x} p^{x} q^{n-x}}{\sum_{j=0}^{N} \binom{n}{j} p^{j} q^{n-j}} . (N<n)]$$

**enquiry,** *n.* ( *also* inquiry ) चौकशी (स्त्री.)

*cf.* investigation, अन्वेषण

survey, सर्वेक्षण

*ad hoc* **enquiry,** तदर्थ चौकशी

**complete enquiry,** संपूर्ण चौकशी

**continuous enquiry,** संतत चौकशी

**direct enquiry,** प्रत्यक्ष चौकशी

**incomplete enquiry,** अपूर्ण चौकशी

**indirect enquiry,** अप्रत्यक्ष चौकशी

**intermittent enquiry,** अंतरित चौकशी

**non-representative enquiry,** अप्रातिनिधिक चौकशी

**over-complete enquiry,** अतिपूर्ण चौकशी

**periodic enquiry,** आवर्तनी चौकशी

**pilot enquiry,** पथदर्शी चौकशी

**representative enquiry,** प्रातिनिधिक चौकशी

**ensemble,** *n.* **प्रसंच** (पु.)
[एका (single) यादृच्छिक प्रक्रमाच्या निष्पत्तींच्या (realisations) अनंत संचाला 'प्रसंच' असे म्हणतात. ही संकल्पना (concept) निष्पत्तींच्या नमुना संचालाही बरेच वेळा लागू होते.]

**ensemble average, प्रसंच माध्य**

**entrance time, प्रवेश काल** *cf.* first passage time

**entropy,** *n.* **एन्ट्रॉपी** (स्त्री.), **व्यतिकार** (पु.)

**entry plot,** (as, in serial cluster) **प्रवेश एकक**

**enumerate,** *v.t.* **१ अनुगणन करणे २ प्रगणन करणे**

**enumeration schedule, प्रगणन अनुसूची**

**enumerative data, प्रगणनी आधारसामग्री**

**envelope power function, प्रबलता फल परि–स्पर्शक**

**EOQ,** (*abbr.* of economic order quantity) **किमान** (किफायती मागणी नगसंख्या)

**EOQ problem,** (*abbr.* of economic order quantity problem) **किमान समस्या** (किफायती मागणी नगसंख्या समस्या)

**ephemeral state, क्षणिक स्थिति**

**epsem,** (*abbr.* of equal probability of selection method) **ससंनिप** (समान संभाव्यता निवड पद्धति)

**'epsem' sampling,** (*abbr.* of equal probability of selection method sampling) **'ससंनिप' नमुनानिवड** (समान संभाव्यता निवड पद्धति नमुनानिवड)

**equalisation,** *n.* **समानीकरण** (न.)

**equalising value, समकारी मूल्य**

**equal lot sizeplan, समान आकारी गठ्ठा योजना**

**equally correlated distribution, समसंबंधी वितरण**

**equally probable, समसंभाव्य**

**equal probability of selection method,** (*abbr.* epsem) **समान संभाव्यता निवड पद्धति** (ससंनिप)

**equal probability of selection method sampling,** (*abbr.* 'epsem' sampling) **समान संभाव्यता निवड पद्धति नमुनानिवड** (ससंनिप नमुनानिवड)

**equal spacings test, समान अंतरण कसोटी**

**equal-tails test, समपुच्छ कसोटी**

**equal unit scaling, समान एकक मापन**

**equation,** *n.* **समीकरण** (न.)

**equi-distant,** *adj* **.समदूर**

**equilibrium,** *n.* **समतोल** (पु.)
[एखाद्या रांग पद्धतीतील वाट पाहत असणाऱ्या ग्राहकांची किंवा वस्तूंची संख्या कमी-अधिक होत असताना त्या संख्येचा मध्य आणि तिचे वितरण ही दोन्ही पुरेशा दीर्घ कालपर्यंत (over a long period) स्थिर राहत असतील तर अशी रांग पद्धती संख्याशास्त्रीय समतोल अवस्थेत आहे असे म्हणतात.]

**equilibrium condition. समतोलाची शर्त**

**equilibrium distribution, समतोल वितरण**
[एखाद्या भौतिक, आर्थिक किंवा सामाजिक पद्धतीची संख्याशास्त्रीय वर्तणूक स्थिर झालेली असेल तेव्हा तिचे वितरण स्थिर किंवा समतोल असते असे म्हणतात. पद्धतीच्या निर्दिष्ट अवस्थांत व्यतीत झालेल्या काळाची सीमांतस्थ गुणोत्तरे या वितरणाने दाखविली जातात.]

**equilibrium of exchange, विनिमय समतोल**

**equilibrium probability, समतोल संभाव्यता**

**equilibrium purchase, समतोल खरेदी**

**equi-Normal distribution, सम-प्रसामान्य वितरण**

**equipment,** *n.* **साधनसामग्री** (स्त्री.)

**equi-probable,** *adj.* **समसंभाव्य**
**equitable game, न्याय्य खेळ**
*cf.* fair game, रास्त खेळ
**equivalence,** *n.* १ **सममूल्यता** (स्त्री.)
२ **समतुल्यता** (स्त्री.)
**equivalence class, समतुल्यता वर्ग**
**equivalent average return, समतुल्य सरासरी प्राप्ति**
**equivalent deviate, समतुल्य विचल**
**equivalent dose, समतुल्य मात्रा**
**equivalent process, समतुल्य प्रक्रम**
**equivalent samples, समतुल्य नमुने**
**ergodic,** *adj.* **स्थलकालनिरपेक्ष**
**ergodicity,** *n.* **स्थलकालनिरपेक्षता** (स्त्री.)
**ergodic process, स्थलकालनिरपेक्ष प्रक्रम**
**ergodic property, स्थलकालनिरपेक्ष गुणधर्म**
**ergodic state, स्थलकालनिरपेक्ष स्थिति, सुलक्षणी स्थिति**
[ मार्कोव्ह मालिकेतील अनावर्तनी व सत्वरावर्ती स्थितीला 'स्थलकालनिरपेक्ष स्थिती' असे म्हणतात. अनावर्तनीत्व व सत्वरावर्तित्व असे दोन चांगले गुणधर्म या स्थितीला असल्यामुळे तिला 'सुलक्षणी स्थिती' असेही म्हणतात. या स्थितीचा पुनरावर्तन काल सांत असतो. ]
**ergodic theorem, स्थलकालनिरपेक्ष प्रमेय**
**Erlang distribution, अर्लँग वितरण**
**error,** *n.* **दोष** (पु.)
**error band, दोष पट्टा**
[आकलित किंवा अंदाजित मूल्यांच्या कक्षा विश्वास अंतराल किंवा तत्सम पद्धतीने ठरवतात. ही मूल्ये ज्या क्षेत्रात असतात त्या क्षेत्रास 'दोष पट्टा' म्हणतात.]
**error-choice technique, दोष-निवड तंत्र**
**error function, दोष फल**
**error function complement, दोष फल परिपूरक**
**error in surveys, सर्वेक्षण दोष**
**error mean-square, दोषवर्ग मध्य**
**error of estimation, आकलन दोष**
**error of first kind,** (*also* called **type I error**) **पहिल्या प्रकारचा दोष**
**error of observation,** ( *also* **observational error** ) **अवलोकन दोष** *cf.* **non-sampling** error
**error of regression coefficient testing, समाश्रयण गुणांक दोष चाचणी**
**error of second kind,** (*also* called **type II error**) **दुसऱ्या प्रकारचा दोष**
**error of third kind,** (*also* called **type III error**) **तिसऱ्या प्रकारचा दोष**
**error reducing index, दोष लघूकरण सूचकांक**
**error reducing power, दोष लघूकरण क्षमता**
**errors in equations, समीकरण दोष**
**errors in variables, चल दोष**
**error sum of squares,** (*also* **discrepance**) **दोष वर्गबेरीज**
**error variance, दोष प्रचरण**
**Esseen's lemma, एसीन सहायक प्रमेय**
**Esseen-type approximation, एसीन-प्रकार समीपन**
**EST,** (*abbr.* of **earliest starting time**) **लसुवे** (लवकरात लवकर सुरू करण्याची वेळ)
**estimable,** *adj.* **आकलीय**
**estimate,** *n.* **आकल** (पु.)
*v. t.* **आकल करणे**
**estimated,** *adj.* **आकलित**
**estimating,** *adj.* **आकलनी, आकल—, आकलन—**
**estimating equation, आकल समीकरण**
**estimation,** *n.* **आकलन** (न.)
**estimator,** *n.* **आकलक** (पु.)
**Eta coefficient, इटा गुणांक**
**evaluate,** *v. t.* **किंमत काढणे**

even summation, सम समाकलन
event, *n.* घटना (स्त्री.)
event space, घटना अवकाश
event step incrementation, घटनापदी पुर:सरण
event sub-routine, घटना उप-नित्यक्रम
event-type simulation, घटनानिष्ठ अनुकार
evolutionary operation, विकासकारी क्रिया
[प्रस्थापित पूर्णविकसित प्रक्रियांच्या इष्टतमीकरणाकरिता (optimisation) बॉक्सने काढलेले तंत्र. उत्पादन प्रक्रियांमध्ये प्रयोग करण्याकरिता या तंत्राचा वापर केला जातो.]
evolutionary process, विकासकारी प्रक्रम
*cf.* non-stationary stochastic process, अस्थिर यादृच्छिक प्रक्रम
[कोणताही अस्थिर (non-stationary) यादृच्छिक प्रक्रम. अशा प्रक्रमांशी संबंधित असलेले संभाव्य वितरण कालदृष्टया निरवलंबी नसते.]
evolutionary spectrum, विकासकारी मानपंक्ति
[कोणत्याही यादृच्छिक प्रक्रमात किंवा कालक्रमिकेमध्ये मानपंक्ती फक्त एका मर्यादित कालावधीकरिताच लागू असल्यामुळे पूर्ण निष्पत्तीकरिता मानपंक्ति फल हे कालावलंबी किंवा विकासकारी असते.]
exact chi-squared test, (*also* called Fisher-Yates test) तंतोतंत कायवर्ग कसोटी
'exact' statistical method, तंतोतंत संख्याशास्त्रीय पद्धति
examiner reliability, परीक्षक विश्वसनीयता
exceedance life test, अपर आयुर्मान कसोटी
exceedance test, अपरत्व कसोटी
*cf.* precedence test, पूर्वत्व कसोटी
exclusive type of class interval, वर्ग अंतराळाचे वर्जक प्रकार
exhaustive sampling, सर्वसमावेशक नमुना-निवड
existence theorem, अस्तित्व प्रमेय
existence theorem for additive process, बेरीजयोग्य प्रक्रमाचे अस्तित्व प्रमेय
exogenous event, बहिर्जात घटना
exogenous variate, बहिर्जात चल
expanding economy, विस्तारी अर्थव्यवस्था
expansion factor, विस्तार गुणक
expansion model, विस्तार प्रतिमान
expansion path, विस्तार पथ
expectancy table, अपेक्षा सारणी
expectation, *n.* अपेक्षा (स्त्री.)
expectation of life, आयुर्मान अपेक्षा
expectation of the game, खेळाची अपेक्षा
expected cycle cost, अपेक्षित आवर्तन परिव्यय
expected duration, अपेक्षित अवधि
expected frequency, अपेक्षित वारंवारता
expected mutual information, अपेक्षित परस्पर अवगम
expected probit, अपेक्षित प्रसामान्यक
expected value, अपेक्षित मूल्य
expected values of mean square, वर्गमध्याची अपेक्षित मूल्ये
experiment, *n.* प्रयोग (पु.)
experimental error, प्रयोगजन्य दोष
experimental unit, प्रायोगिक एकक
explanatory variable, स्पष्टीकरणात्मक चल
explicit, *adj.* व्यक्त
explicit expression, व्यक्त पदावली, व्यक्त राशि
explicit weighting, व्यक्त भारण
exploratory survey = pilot survey
explosive oscillation, स्फोटक दोलन
explosive process, स्फोटक प्रक्रम
explosive state, स्फोटक स्थिति
explosive stochastic difference equation, स्फोटक यादृच्छिक अंतर समीकरण

**exponential arrival,** घातांकी आगमन
**exponential curve,** घातांकी वक्र
**exponential distribution,** घातांकी वितरण
**exponential family,** घातांकी कुल
**exponential family of distributions,** वितरणांचे घातांकी कुल
**exponential random numbers,** घातांकी यादृच्छिक संख्या
**exponential regression,** घातांकी समाश्रयण
**exponential service,** घातांकी सेवा
**exponential smoothing,** घातांकी नितळण
**exposed to risk of,** —ला सन्मुख
[कोणत्याही प्रमाणातला अंश म्हणजे त्या प्रमाणाने दर्शविलेल्या घटनांची संख्या असते आणि छेद, त्या घटनेची सन्मुख संख्या असते.]
**expression,** *n.* १ पदावली (स्त्री.) २ राशि (स्त्री.)
**expressive movement,** सूचक हावभाव
**extended group divisible design,** वर्धित गट विभाज्य संकल्पन
**extended Helly-Bray theorem,** वर्धित हेली-ब्रे प्रमेय
**extended hypergeometric distribution,** वर्धित अतिगुणोत्तरीय वितरण
**extensive sampling,** व्यापक नमुनानिवड
**external diseconomies,** परिव्ययवर्धक बाह्य प्रतिकूलता
**external economies,** परिव्ययऱ्हासक बाह्य अनुकूलता
**external variance,** बाह्य प्रचरण
[ही संज्ञा दोन अर्थांनी वापरतात. (१) (द्विटप्पी) (two stage) नमुनानिवड पद्धतीतील प्राथमिक घटकांचे प्रचरण (variance of primary unit) आणि (२) कलाच्या (trend) दिलेल्या प्रकारावर (form) आधारलेल्या विशिष्ट काल क्रमिकेमधील भविष्यकालीन हालचालींच्या पूर्वानुमानांचे (forecasts) प्रचरण.]
**extra period change over design,** अतिरिक्त अवधि क्रमबदल संकल्पन
**extrapolation,** *n.* बहिर्वेशन (न.)
**extremal intensity,** चरम तीव्रता
**extremal process,** चरम प्रक्रम
**extremal quotient,** चरम गुणोत्तर
**extremal statistic,** चरम नमुनाफल
**extremal value distributions** = **extreme value distributions**
**extreme mean,** चरम मध्य
**extreme non-random mating,** (*also* called assortative mating) अयादृच्छिकतम समागम
**extreme point,** चरम बिंदु
**extreme point solution,** चरम बिंदु उकल
**extreme rank sum test,** चरम क्रमांक बेरीज कसोटी
**extreme studentised deviate,** चरम स्टूडंटीकृत विचल
**extreme value distributions,** (*also* extremal value distributions) पराकोटी मूल्य वितरणे
**extreme values,** चरम मूल्ये
**extremum problem,** चरम समस्या
**eye estimate,** नजर आकल

# F

**face validity,** १ दर्शनी समर्पकता २ दर्शनी वैधता

**face value,** दर्शनी मूल्य

**facilities planning,** सुविधा नियोजन

**factor,** *n.* घटक (पु.)

**factor analysis,** (*also* multiple factor analysis) घटक विश्लेषण

**factor antithesis,** घटक व्युत्क्रमण सूत्र *cf.* time antithesis
[निर्देशांक सिद्धांतात कधीकधी वापरली जाणारी संज्ञा. या पद्धतीने लापेर निर्देशांकावरून पाशे (Paasche) निर्देशांक मिळवता येतो.]

**factorial,** *adj.* १ क्रमगुणित २ घटकचय ३ बहुघटकी ४ घटकानुसारी

**factorial cumulant,** क्रमगुणित संचयक

**factorial cumulant generating function,** क्रमगुणित संचयक जनक फल

**factorial design,** बहुघटकी संकल्पन

**factorial experiment,** घटकचय प्रयोग

**factorial moment,** क्रमगुणित परिबल

**factorial moment generating function,** क्रमगुणित परिबल जनक फल

**factorial multinomial distribution,** क्रमगुणित बहुलपदी वितरण

**factorial sum,** क्रमगुणित बेरीज

**factorial validity,** १ घटकानुसारी समर्पकता २ घटकानुसारी वैधता

**factorisation theorem,** अवयव प्रमेय

**factor loading,** (*also* test coefficient) घटक भारण

**factor matrix,** घटकभार सारणी

**factor pattern,** घटकभार मांडणी

**factor reversal,** घटक व्युत्क्रमण

**factor reversal test,** घटक व्युत्क्रमण कसोटी

**factor rotation,** घटक परिवलन

**factor structure,** घटक बंध

**failure,** *n.* १ अवसाद (पु.) २ अपयश (न.), विफलता (स्त्री.), असफलता (स्त्री.)
(as in : failure model विफलता प्रतिमान)
(as in : failure rate असफलता प्रमाण)

**failure model,** विफलता प्रतिमान

**failure rate,** असफलता प्रमाण

**failure time distribution,** अवसाद काल वितरण

**fair coin,** (*also* good coin *or* unbiassed coin) ससंनाणे (समसंभाव्य नाणे)
[जे नाणे फेकले असता चित किंवा पट यांची संभाव्यता $\frac{1}{2}$ असते, असे नाणे म्हणजे 'ससंनाणे' होय.]

**fair game,** रास्त खेळ *cf.* equitable game

**faking,** *n.* बनावटीकरण (न.)

**fallacy of averages,** सरासरीजन्य दोष

false positive, मिथ्या स्वीकृत
family census, कुटुंब प्रगणन
family of finite dimentional distribution, सांत मिति वितरणांचे कुल
family of probability measures, संभाव्यतामान कुल
fanshaped distribution, पंखाकृति वितरण
Farnsworth dichotomous test, फार्नस्वर्थ द्वंद्वभाजी कसोटी
fastest server rule, (*abbr*. FSR) शीघ्रतम सेवाकेंद्र नियम (शीसेनि)
Fatou's lemma, फाटू सहायक प्रमेय
favourable, *adj*. अनुकूल
FCFS, (*abbr*. of first come first served) प्रआप्रसे (प्रथम आगमन प्रथम सेवा)
'F' distribution, 'F' वितरण *cf*. variance ratio distribution
feasibility study, शक्यता अभ्यास
feasible region, शक्य प्रदेश, शक्य क्षेत्र
feasible solution, शक्य उकल
fecundity, *n*. गर्भधारणाक्षमता (स्त्री.)
fecundity rate, गर्भधारणा प्रमाण
feed back, प्रतिपोषण (न.)
feed back transfer function, प्रतिपोषण रूपांतर फल
Fellegi's method, फेलेगी पद्धति
feminity, *n*. स्त्रीत्व (न.)
Fermi-Dirac statistics, फेर्मि-डिरॅक संविभाजन
fertility, *n*. १ जननक्षमता (स्त्री.), प्रसवता (स्त्री.) २ *Agric*. सुपीकता (स्त्री.)
fertility gradient, सुपीकता प्रवणता
fertility rate, १ जननक्षमता प्रमाण २ सुपीकता प्रमाण
Fiacco-McCormick SUMT algorithm, फिॲक्को-मॅक्कॉरमिक अअकतं रीत
fiducial distribution, श्रद्धामूलक वितरण
fiducial inference, श्रद्धामूलक अनुमान
fiducial limits, श्रद्धामूलक मर्यादा
fiducial probability, श्रद्धामूलक संभाव्यता
field, *n*. क्षेत्र (न.)
Fieller's theorem, फिलर प्रमेय
FIFO, (*abbr*. of first in first out) प्रआप्रबा (प्रथम आत प्रथम बाहेर)
filial generation, संतानीय पिढी
filter, *n*. गाळणी (स्त्री.)
finite arc sine distribution, सांत व्यस्त ज्या वितरण
finite geometric method, सांत भूमितीय पद्धति
finitely often, सांततः वारंवार
finite Markov chain, सांत मार्कोव्ह् साखळी
finite multiplier, (*also* finite population multiplier) सांत समष्टि गुणक
finite population, सांत समष्टि
finite population correction, (*abbr*. fpc) सांत समष्टि सुधार (सांसु)
finite population correlation, सांत समष्टि सहसंबंध
finite population multiplier = finite multiplier
finite sampling correction, सांत नमुनानिवड सुधार
finite source population, सांत उद्‌गम समष्टि
finite source queue, सांत उद्‌गम रांग
first arrival time, प्रथम आगमन काल
first come first served, (*abbr*. FCFS) प्रथम आगमन प्रथम सेवा (प्रआप्रसे)
first come first served discipline, प्रथम आगमन प्रथम सेवा शिस्त
first exit distribution, प्रथम उल्लंघन वितरण
first exit time, प्रथम उल्लंघन काल
first in first out, (*abbr*. FIFO) प्रथम आत प्रथम बाहेर (प्रआप्रबा)

**first limit theorem,** पहिले सीमा प्रमेय
[संचयी वितरण फलांचो क्रमिका जर $F$ या एकाच संचयी वितरण फलाकडे अभिसारित होत असेल तर संबंधित लक्षण-फले $F$ च्या लक्षण फलाकडे अभिसारित होतात. हे अभिसरण सांत अंतरालात एकसमान असते. यालाच सर्वसाधारणपणे 'पहिले सीमा प्रमेय' म्हणतात.]

**first order interaction,** प्रथम कोटिका आंतर-क्रिया

**first passage,** प्रथम आविर्भवन

**first passage time,** प्रथम आविर्भवन काल
*cf.* entrance time, प्रवेश काल

**first passage time mean,** प्रथम आविर्भवन काल मध्य

**first stage unit,** पहिला टप्पा घटक
*cf.* primary unit

**Fisher-Behrens problem,** फिशर-बेहेरेन्स समस्या

**Fisher-Behrens test,** (*also* called **Behrens-Fisher test)** फिशर-बेहेरेन्स कसोटी

**Fisher-Hsu-Roy distribution,** फिशर-सू-रॉय वितरण

**Fisher-Irwin test,** फिशर-आर्यविन कसोटी

**Fisher model,** फिशर प्रतिमान

**Fisher's 'B' distribution,** फिशर 'B' वितरण

**Fisher's distribution,** फिशर वितरण

**Fisher's inequality,** फिशर असमानता

**Fisher's least significance difference test,** फिशरची लघुतम लक्षणीयता फरक कसोटी

**Fisher's transformation of the correlation coefficient,** सहसंबंध गुणांकाचे फिशर रूपांतरण

**Fisher-Yates test,** (*also* called **exact chi-squared test)** फिशर-येट्स् कसोटी

**fit,** *v. t.* अन्वायोजन करणे

**fitting of a curve,** वक्राचे अन्वायोजन

**fitting of frequency formula,** वारंवारता सूत्रांचे अन्वायोजन

**five-point assay,** पंचबिंदु आमापन

**fixed base,** स्थिर आधार

**fixed base index,** स्थिर आधार निर्देशांक

**fixed charge problem,** नियत आकार समस्या

**fixed demand proportion,** स्थिर मागणी प्रमाण

**fixed effect,** स्थिर परिणाम

**fixed effects model,** (*also* constants model) स्थित परिणाम प्रतिमान

**fixed mathematical model,** स्थिर गणितीय प्रतिमान

**fixed sample,** स्थिर नमुना

**fixed time increment,** नियत काल वाढ

**fixed variate,** स्थिर चल

**fixed weight aggregate,** स्थिर भार समुच्चय

**fixed weight aggregative index,** स्थिर भार समुच्चय निर्देशांक

**fleet scheduling,** ताफा अनुसूचीकरण

**flexibility of closure,** संवृतीची नम्यता

**flexibility test,** नम्यता कसोटी

**flow augmenting path,** प्रवाहवर्धक पथ

**flow capacity,** प्रवाह क्षमता

**flow chart,** ओघ पत्र

**flow diagram,** प्रवाह आकृति

**flow gain,** प्रवाह लाभ

**flow in network,** जाल प्रवाह

**fluctuation,** *n.* चढउतार (पु.)

**Fokker-Planck equation,** फॉकर-प्लँक समीकरण

**folded contingency table,** घडीचे आसंग कोष्टक
[म्हणजे सममित आसंग कोष्टक. या ठिकाणी $f_{ij} = f_{ji}$ .]

**folded median,** (*also* called **Bickel-Hodges estimator)** घडीचे मध्यक

**folded Normal distribution,** घडीचे प्रसामान्य वितरण

[निरीक्षण मूल्ये चिन्हाशिवाय (+ किंवा –) लिहिली गेल्यास निरीक्षणांच्या मूळ वितरणाऐवजी केवळ (absolute) निरीक्षणांचे वितरण घ्यावे लागेल. मूळ वितरण प्रसामान्य असल्यास अशा वितरणास 'घडीचे प्रसामान्य वितरण' म्हणतात.]

**folding,** *n.* घडी (स्त्री.)

[माहिती गोळा केल्यानंतर कधीकधी योग्य चिन्हाशिवाय निरीक्षणमूल्ये लिहिली जातात. सर्व ऋणबिंदू धनबिंदूवर घडी पडल्यागत जमा होतात. त्यामुळे मूळ वितरणावर परिणाम होतो.]

**follow-up,** *n.* पाठपुरावा (पु.)

**forced choice technique,** अनिवार्य निवड तंत्र

**force of decrement,** घटप्रभाव (पु.) *cf.* force of mortality, मर्त्यता प्रभाव

[वार्षिक प्रमाणाच्या रूपात व्यक्त केलेले घटीचे तत्क्षणिक माप]

**force of mortality,** मर्त्यता प्रभाव *cf.* force of decrement

[हे फल $x$ या वयाला $\mu_x$ (म्यु) या चिन्हाने दाखविले जाते. या फलाने $x$ या वयाला $l_x$ ($x$ वयाला हयात व्यक्ति संख्या) या फलाची किंमत कमी होण्याचे दरडोई दरसाल प्रमाण कळते. म्हणजेच $x$ वयाला हयात व्यक्ति संख्या $l_x$ ने दाखविली तर $\mu_x = -\frac{1}{l_x}\frac{dl_x}{dx}$. घट प्रभावाचे स्पष्टीकरण याचसारखे आहे. फक्त त्यात घटीचे कारण कोणतेही असू शकते.]

**forecasting,** *n.* पूर्वानुमान (न.)

**formation of lots,** गठ्ठे बनवणे

**formula,** *n.* सूत्र (न.)

**formulating a model,** प्रतिमान तयार करणे

**forward and backward equations,** (*also* called Kolmogorov equations) पुरोग व पश्चग समीकरणे

(पहा : Kolmogorov equations)

**Foster's criteria,** फॉस्टर निकष

**fourfold table,** चौखणी कोष्टक *cf.* two-by-two frequency table

[२ × २ वारंवारता कोष्टकाचे वैकल्पिक नाव. दुहेरी द्वंद्वभाजनामुळे एकूण वारंवारतेचे चार घटांत विभाजन होते यावरून हे नाव ठेवले आहे. यापेक्षा '२ × २' (किंवा 'दोन-दोन'चे) कोष्टक हे शब्दप्रयोग अधिक चांगले वाटतात.]

**Fourier analysis,** फूरिए विश्लेषण

**fpc,** (*abbr.* of finite population correction) सांसमु (सांत समष्टि सुधार)

**fractile,** *n.* (*also* quantile) भागक (न.)

**fractile graphical analysis,** भागक आलेखी विश्लेषण

**fractional programming = hyperbolic programming**

**fractional replication,** आंशिक पुनरावृत्ति

**fraction defective,** दोषांश (पु.)

**frame,** *n.* १ चौकट (स्त्री.) २ आराखडा (पु.)

**Fraser-Sprott equation,** फ्रेझर-स्प्रॉट समीकरण

**Fréchet distribution,** फ्रेचेट वितरण

**Fréchet's inequalities,** फ्रेचेट असमानता

**free entry,** मुक्त प्रवेश

**free goods,** १ मुक्त वस्तू, मुक्त माल २ नि:शुल्क वस्तू, नि:शुल्क माल

**freehand method,** मुक्तहस्त पद्धति

**Freeman-Tukey transformation,** फ्रीमन-टकी रूपांतरण

free variable, मुक्त चल

free variation, मुक्त विचरण

frequency, *n.* वारंवारता (स्त्री.)

frequency curve, वारंवारता वक्र

frequency distribution, वारंवारता वितरण

frequency function, वारंवारता फल

frequency interpretation, वारंवारता विवरण

frequency moment, वारंवारता परिबल

frequency polygon, वारंवारता बहुकोन, वारंवारता बहुभुज

frequency response function, (*also* called transfer function) वारंवारता प्रतिसाद फल [कालक्रमिका विश्लेषणात $u(t)$ चा रेषीय भारित सरासरी $v(t)$ पुढीलप्रमाणे आहे :

$$v(t) = \int_{0}^{\infty} a(\tau)\, u(t-\tau)\, d\tau$$ येथे $a(\tau)$

ही एक भार पद्धती. वारंवारता प्रतिसाद फल किंवा रूपांतर फल हे $a(\tau)$ चे लक्षण फल, $w(\alpha) = \int_{0}^{\infty} e^{i\tau\alpha}\, a(\tau)\, d\tau$ असे असते.]

frequency surface, वारंवारता पृष्ठ

frequency table, वारंवारता कोष्टक, वारंवारता सारणी

frequency theory of probability, वारंवारता संभाव्यता वाद

Freund-Ansari test, फ्रॉइंड-अन्सारी कसोटी

Friedman's test, फ्रीडमन कसोटी

Frobenius theorem, फ्रोबिनिअस प्रमेय

FSR, (*abbr.* of fastest server rule) शीसेनि (शीघ्रतम सेवाकेंद्र नियम)

F-test, *n.* F-कसोटी (स्त्री.)

full brother, सख्खा भाऊ

full information method, पूर्ण अवगम पद्धति

function, *n.* फल (न.)

functional central limit theorem, (*also* called Donsker's theorem) फलीय केंद्रीय सीमा प्रमेय

function-fluctuation, *n.* कार्यबदल (पु.)

functioning, *adj.* कार्यानुवर्ती

fundamental identity, मूलभूत नित्यसमीकरण

fundamental probability set, मूलभूत संभाव्यता संच

fundamental random process, मूलभूत यादृच्छिक प्रक्रम

# G

**Gabriel-Sen statistic,** गेब्रिअल-सेन नमुनाफल
**Gabriel's test,** गेब्रिअल कसोटी
**gain,** *n.* लाभ (पु.)
**gain in network,** जालकरचना लाभ
**Galton-McAllister distribution,** गाल्टन-मॅक-ॲलिस्टर वितरण
**Galton ogive,** गाल्टन ओगिव्ह
**Galton's individual difference problem,** गाल्टनची व्यक्तिगत भेद समस्या
**Galton's rank order test,** गाल्टन क्रमानुक्रम कसोटी
**Galton-Watson process,** गाल्टन-वॉटसन प्रक्रम
**gambler's gain,** जुगाऱ्याची प्राप्ती
**gambler's ruin,** जुगाऱ्याचा विनाश
**gambler's ultimate ruin,** जुगाऱ्याचा अंतिम विनाश
**gambling problem,** जुगारातील समस्या
**game,** *n.* खेळ (पु.)
**gamete,** *n.* युग्मक (न.)
**game theory,** खेळशास्त्र (न.)
**gamma coefficients,** गॅमा गुणांक
**gamma distribution,** गॅमा वितरण
**Gani's mean difference,** गनी अंतर मध्य
**Gantt chart,** (*also* called **Gantt progress chart**) गॅंट आकृति
**Gantt progress chart,** (*also* called **Gantt chart**) गॅंट प्रगति आकृति
**Gart's test,** गार्ट कसोटी
**Garwood distribution,** गारवूड वितरण
**Gauss distribution,** गाऊस वितरण
**Gauss-Markov model,** गाऊस-मार्कोव्ह प्रतिमान
**Gauss-Markov theorem,** गाऊस-मार्कोव्ह प्रमेय
**Gauss-Poisson distribution,** गाऊस-प्वॉसॉं वितरण
**Gauss-Seidel method,** गाऊस-सैडल पद्धति
**Gauss-Winckler inequality,** गाऊस-विंक्लेअर असमानता
**Geary's ratio,** गेरी गुणोत्तर
**gene,** *n.* जनुक (न.)
**general economic equilibrium,** सर्वसाधारण आर्थिक समतोल
**general factor,** सर्वसामान्य घटक
**general input distribution,** सर्वसाधारण आदान वितरण
**general interdependent system,** सामान्य अन्योन्यावलंबी पद्धति
**generalised,** *adj.* व्यापकीकृत
**generalised binomial distribution,** व्यापकीकृत द्विपद वितरण
**generalised bivariate exponential distribution,** व्यापकीकृत द्विचल घातांकी वितरण
**generalised Brownian motion process,** व्यापकीकृत ब्राऊन संचार प्रक्रम

generalised Brownian process, व्यापकीकृत ब्राऊन प्रक्रम

generalised classical linear estimators, व्यापकीकृत रूढ एकघाती आकलक

generalised contagious distribution, व्यापकीकृत सांसर्गिक वितरण

generalised distribution, व्यापकीकृत वितरण

generalised gamma distributions, व्यापकीकृत गॅमा वितरणे

generalised inverse, (*abbr.* g-inverse) व्यापकीकृत व्यस्त (g-व्यस्त)

generalised least squares estimator, व्यापकीकृत लघुतम वर्ग आकलक

generalised maximum likelihood estimator, व्यापकीकृत महत्तम संभव आकलक

generalised multinomial distribution, व्यापकीकृत बहुलपदी वितरण

generalised Normal distribution, व्यापकीकृत प्रसामान्य वितरण

generalised polykays, व्यापकीकृत बहु ($k$) नमुनाफले

generalised power series distribution, व्यापकीकृत घातश्रेणी वितरण

generalised programming algorithm, व्यापकीकृत प्रायोजन रीत

generalised right angular designs, व्यापकीकृत काटकोनी संकल्पने

generalised sequential probability ratio test, व्यापकीकृत अनुक्रमी संभाव्यता गुणोत्तर कसोटी

generalised STER distribution, व्यापकीकृत 'व्यस्तछेदन' वितरण

generalised $T^2$ distribution, व्यापकीकृत $T^2$ वितरण

general market equilibrium, सर्वसाधारण बाजार समतोल

general test for non-additivity, बेरीज अयोग्यता सर्वसाधारण कसोटी

generating function, जनक फल

generation, *n.* पिढी (स्त्री.)

genetic, *adj.* जनुकीय, आनुवंशिक

genetics, *n.* अनुवंशशास्त्र (न.), जनुकशास्त्र (न.)

genotype, *n.* जनुकविधा (स्त्री.)

geometric distribution, भूमिति वितरण

geometric mean, भूमिति मध्य

geometric moving average, घातीय सरकता मध्य

geometric range, भूमिति कक्षा

Gibrat distribution, गिब्राट वितरण

Gini's $\delta$ index, गिनीचा $\delta$ (डेल्टा) सूचकांक

Gini's hypothesis, गिनी परिकल्पना

Gini's index of cograduation, गिनी सह-क्रमांकन निर्देशांक

g-inverse, *n.* (*abbr.* of generalised inverse) g–व्यस्त (पु.) (व्यापकीकृत व्यस्त)

Glivenko-Cantelli lemma, ग्लिव्हेंको–कॅंटेली सहायक प्रमेय

Glivenko's theorem, ग्लिव्हेंको प्रमेय

global coefficient, समुच्चय गुणांक

global index, समुच्चय निर्देशांक

Gnedenko-Koroljuk theorem, नेडेन्को-कोरोल्जुक प्रमेय

Gnedenko's theorem, नेडेन्को प्रमेय

GNP, (*abbr.* of gross national product) स्थूराउ (स्थूल राष्ट्रीय उत्पादित वस्तु मूल्य)

Gompertz curve, गोम्पर्ट्झ वक्र

go-no-go alternatives, जा-न-जा पर्याय

good coin = fair coin

good die, ससंफासा (समसंभाव्य फासा)

Goodman-Kruskal G statistic, गुडमन-क्रुस्कल G नमुनाफल
Goodman-Kruskal tau (τ), गुडमन-क्रुस्कल टाउ (τ)
goodness of fit, अन्वायोजन समर्पकता
Goodwin, Kalecki and Philips models, गुडविन, कॅलेकी व फिलिप्स प्रतिमाने
Goutereau's constant, गौटेरो स्थिरांक
grade, *n.* अंशक्रम (पु.)
grade correlation, अंशक्रम सहसंबंध
grade norm, श्रेणी प्रमाणक
graduation, *n.* प्रसरलन (न.)
*cf.* smoothing, नितळण
graduation curve, अंशांकन वक्र
graeco-latin square, ग्रीको-लॅटिन चौरस
Gram-Charlier series type A, ग्राम-शार्लिए श्रेणी प्रकार A
Gram-Charlier series type B, ग्राम-शार्लिए श्रेणी प्रकार B
Gram-Charlier series type C, ग्राम-शार्लिए श्रेणी प्रकार C
Gram-Schmidt orthogonalisation, ग्राम-श्मिट लंबकीकरण
Gram's criterion, ग्रामचा निकष
graphical estimator, आलेखी आकलक
graphical representation, आलेखी निरूपण
Grenander's uncertainty principle, ग्रेनॅन्डर अनिश्चितता तत्त्व
grid, *n.* जाळी (स्त्री.)
grid sample in two dimensions, द्वि-मितीय जाळी नमुना
grid sampling, जाळी नमुनानिवड
gross national product, (*abbr.* GNP) स्थूल राष्ट्रीय उत्पादित वस्तु मूल्य (स्थूराउ) [विशिष्ट कालावधीत देशात उत्पादन केलेला माल व सेवा यांचे एकूण मूल्य.]
gross nuptiality table, एकूण विवाह कोष्टक (पहा : net nuptiality table)
gross reproduction rate, एकूण प्रजनन प्रमाण (पहा : net reproduction rate)
group, *n.* गट (पु.)
group comparison, गट तुलना
group divisible design, गट-विभाज्य संकल्पन
group divisible incomplete block design, गट विभाज्य अपूर्ण खंड संकल्पन
group divisible rotatable design, गट विभाज्य गोलपृष्ठी संकल्पन
grouped data, गटीकृत आधारसामग्री
grouped Poisson distribution, गटबद्ध प्वॉसाँ वितरण
group factor, गट घटक
grouping lattice, गटकारी जालक
grouping of data, सामग्री गटीकरण
group replacement policy, गट पुनःस्थापना धोरण
group screening methods, गट चाळणी पद्धती
group theoretic algorithm, गट औपपत्तिक रीत
growth curve, वृद्धि वक्र *cf.* auto-catalytic curve
growth model, वृद्धि प्रतिमान
Grubbs' estimators, ग्रब्ज आकलक
Grubbs' rule, ग्रब्ज नियम
g—statistics, *n.pl.* g—नमुनाफले (न. अ. व.)
g—test, *n.* g—कसोटी (स्त्री.)
'guess who' technique, 'कोण बरे' तंत्र
Gumbel distribution, गमबेल वितरण
Gumbel's inequalities, गमबेल असमानता
Gupta's subset selection method, गुप्ता उपसंच निवड पद्धति
Gupta's symmetry test, गुप्ता सममित कसोटी

**Gurland's generalisation of Neyman's distribution, नेमन वितरणाचे गुरलँडचे व्यापकीकरण**

[$\lambda_1$, $\lambda_2$, $\alpha$ आणि $\beta$ ही चार धन-प्राचले असलेले नेमन वितरणाचे गुरलँडचे व्यापकीकरण म्हणजे $\lambda_1$ व $\lambda_2 p$ ही दोन प्राचले असलेल्या नेमन प्रकार-*A* वितरणांचे मिश्रण होय. ह्या ठिकाणी p चे वितरण $\alpha$ व $\beta$ ही प्राचले असलेले बीटा वितरण आहे. नेमन वितरणाचे बील-रेसियाचे व्यापकीकरण म्हणजे प्रस्तुत व्यापकीकरणाचे विशिष्ट उदाहरण आहे.]

# H

Hadamard matrix product, हदामर्द सारणी गुणाकार

Hagen's hypothesis, हॅगेन परिकल्पना

Haldane's discrepancy, हाल्डेन विसंगति

Haldane's discrepancy measures, हाल्डेन विसंगति मापे

half-brother, *n.* सावत्र भाऊ (पु.)

half-Cauchy distribution, अर्ध कोशी वितरण

half-drill strip, अर्ध पाभर पट्टी (संकल्पन)

half-invariant = semi-invariant

half-Normal distribution, (*also* semi-Normal distribution) अर्ध प्रसामान्य वितरण

half Normal plots, अर्ध प्रसामान्य आलेखन [द्विपातळी घटकचय प्रयोगामधील भेद स्पष्ट करण्यासाठी योजलेली आलेखन पद्धती. या भेदांचे क्रमांकन करून सुधारित स्वरूपाच्या गणितीय संभाव्यता पत्रावर संचयी वितरण फल म्हणून ते भेद दाखवले जातात. संभाव्यता माप प्रमाणाचा खालचा अर्धा भाग वगळून वरील अर्ध्या भागातील प्रत्येक मूल्याच्या ऐवजी $P' = 2P - 100$ असे लिहिता येईल. नंतर $P' = (i - \frac{1}{2}) / n$ याचे आलेखन नेहमीप्रमाणे करता येईल.]

half-plaid square, अर्ध प्लेड चौरस

half-replicate design, अर्ध पुनरावृत्त संकलपन

half-space, *n.* अर्ध अवकाश (पु.)

half-width, *n.* अर्ध अंतर (न.)

halo effect, वलय प्रभाव

hamming, *n.* हॅमिंग नितळण (न.)

hanning, *n.* हान नितळण (न.)

hard clipping (limiting), कमाल संक्षेपण

hard core, (in non-response) अग्राह्य, कुच्चर, ठणक

Hardy summation method, हार्डीची समाकलन पद्धती

Harley approximation, हार्ले समीपन

harmonic analysis, संवादी विश्लेषण

harmonic component, संवादी घटक

harmonic dial, संवादी तबकडी

harmonic distribution, संवादी वितरण

harmonic mean, संवादी मध्य

harmonic process, संवादी प्रक्रम

Harrison's method, हॅरिसन पद्धति

Harrod-Domar growth theory, हॅरोड-डोमर वृद्धि सिद्धांत

Hartley-Rao scheme, हार्टले-राव योजना

Hartley's test, हार्टले कसोटी

hazard, *n.* धोका (पु.)

hazard rate, धोका मान

*cf.* conditional failure rate, सशर्त असफलता मान

[धोका म्हणजे $t_0$ यावेळी चालू स्थितीत असलेल्या वस्तूची $(t, t+\delta t)$ या काळात

बंद पडण्याची संभाव्यता. ही संभाव्यता $h(x) = f(x) / [1 - F(x)]$ यावरून मिळते. हे तत्क्षणिक बंद पडण्याचे मान चालू स्थितीतील वस्तूच्या बाबतीत वेळोवेळी काढले जाते. यालाच धोका फल असे म्हणतात. ]

**head or tail,** चीत किंवा पट

Hellinger distance, हेलिंजर अंतर

Helly-Bray first theorem, हेली-ब्रे पहिले प्रमेय

Helly-Bray second theorem, हेली-ब्रे दुसरे प्रमेय

Helly-Bray theorem, हेली-ब्रे प्रमेय

Helly lemma, हेली सहायक प्रमेय

Helly's first theorem, हेली पहिले प्रमेय

Helmert criterion, हेल्मर्टचा निकष

Helmert distribution, हेल्मर्टचे वितरण

Helmert transformation, हेल्मर्ट रूपांतरण

Hermite canonical form, हरमाइट प्रमाणभूत रूप

Hermite distribution, (*also* called composed Poisson distribution) हरमाइट वितरण

Hermitian matrix, हरमाइट सारणी

Herschel's hypothesis, हर्शेल परिकल्पना

heteroclitic, *adj.* विषमलिबली

heterogeneity, *n.* अनेकविधता (स्त्री.)

heterogeneous, *adj.* अनेकविध

heterogeneous test battery, अनेकविध कसोटी मालिका

heterokurtic, *adj.* अनेकविध वशिंडी

heteroscedastic, *adj.* अनेकविध प्रकीर्ण

heterotypic, *adj.* विविधरूपी

heterozygote, *n.* विषमयुग्मज (पु.)

heuristic programming, शोधात्मक प्रायोजन

Hewitt-Savage zero one law, हेविट-सॅव्हेज शून्य एक नियम

$Hh_n(x)$ function, $Hh_n(x)$ फल

hierarchical birth and death process, पदानुसारी जन्म-मृत्यु प्रक्रम

hierarchical classification, पदानुसारी वर्गीकरण

hierarchical group divisible design, पदानुसारी गट विभाज्य संकल्पन

hierarchical theories of abilities, क्रमानुसारी क्षमतावाद

hierarchy, *n.* १ पदानुसारी सारणी (स्त्री.) २ उतरंडी (स्त्री.)

high contact, अति स्पर्श

higher priority, उच्च प्राथम्य *cf.* pre-emptive priority

high-low graph, उच्च-नीच आलेख

high proneness, उच्च प्रवणता

hired factor, भाडोत्री घटक

hire-purchase, *n.* भाडे-खरेदी (स्त्री.), भाडे-खरेदी पद्धति (स्त्री.)
*adj.* भाडे-खरेदी–

histogram, *n.* १ (bivariate) इष्टकाकृति (स्त्री.) २ (univariate) आयताकृति (स्त्री.) ३ स्तंभालेख (पु.)

historigram, *n.* कालक्रमिका आलेख (पु.)

hitting point, वेध बिंदु
[नवीकरण प्रक्रमात, वेध बिंदू म्हणजे दिलेल्या कोणत्याही कालबिंदूनंतरचा प्रथम नवीकरण बिंदू. ]

Hodges-Ajne's test, होजेस-ॲजने कसोटी

Hodges bivariate sign test, होजेस द्विचल चिन्ह कसोटी

Hodges-Lehmann one-sample estimator, होजेस-लेहमन एक नमुना आकलक

Hoeffding '$C_1$' statistic, हॉफडिंग '$C_1$' नमुनाफल

Hoeffding's independence test, हॉफडिंग निरवलंबन कसोटी

Hoeffding's inequality, हॉफडिंग असमानता

holding cost, (*also* called carrying cost) साठवणी परिव्यय

**Hollander's bivariate symmetry test,** होलँडर द्विचल सममिति कसोटी
**Hollander's parallelism test,** होलँडर समांतरता कसोटी, होलँडर सादृश्य कसोटी
**Holt's method,** हॉल्ट पद्धति
**homoclitic,** *adj.* समतिबली
**homogeneity,** *n.* एकविधता (स्त्री.)
**homogeneity of data,** सामग्री एकविधता
**homogeneity of test item,** कसोटी कलम एकविधता
**homogeneity postulate,** एकविधता आधारक
**homogeneous,** *adj.* १ एकविध २ समघात
**homogeneous equation,** समघात समीकरण
**homogeneous process,** एकविध प्रक्रम
**homogeneous time process,** (*also* called temporally homogeneous process *or* time homogeneous process) एकविध काल प्रक्रम
(पहा : time homogeneous process)
**homographic association test,** समलेखी साहचर्य कसोटी
**homographs,** *n.* समाक्षरी (स्त्री.)
**homokurtic,** *adj.* एकविध वांशिडी
**homoscedastic,** *adj.* एकविध प्रकीर्ण
**homoscedastic distribution,** एकविध प्रकीर्ण वितरण
**homoscedasticity,** *n.* एकविध प्रकीर्णता (स्त्री.)
**homozygote,** *n.* समयुग्मज (न.)
**honest process,** रीतसर प्रक्रम
**horizon,** *n.* क्षितिज (न.)
**Horvitz and Thompson estimator,** हॉरविट आणि थॉम्पसन आकलक
**Hotelling's principal factor method,** होटेलिंगची प्रमुख घटक पद्धती
**Hotelling's $T^2$,** होटेलिंग $T^2$
$$\left[ T^2 = \Sigma\Sigma f_{ij} \left(\bar{x}_i - \mu_i\right) \left(\bar{x}_j - \mu_j\right) \right]$$
**Hotelling's $T$,** होटेलिंग $T$
**household,** *n.* घरकुल (न.)
*adj.* घरगुती
**Householder transformation,** हाऊसहोल्डर रूपांतरण
**H-test for homogeneity,** एकविधता H-कसोटी
**humped investment,** ककुदी गुंतवणूक
**Hunt-Stein theorem,** हंट-स्टाइन प्रमेय
**Huzurbazar's conjecture,** (sufficiency) हुजूरबाजार अटकळ
**hyperbola,** *n.* अपास्त (पु.)
**hyperbolic programming,** (*also* fractional programming *or* ratio of linear form programming) गुणोत्तरी प्रायोजन
**hyperbolic tangent,** (*abbr.* tanh) अपास्तिक स्पर्श (अपास्प)
**hypercube,** *adj.* अतिघन
**hyperexponential distribution,** अतिघातांकी वितरण
**hypergeometric,** *adj.* अतिगुणोत्तरीय
**hypergeometric distribution,** अतिगुणोत्तरीय वितरण
**hypergeometric waiting time distribution,** अतिगुणोत्तरीय प्रतीक्षा अवधि वितरण
**hyper-graeco-latin square,** अति-ग्रीको-लॅटिन चौरस
**hypernormal dispersion,** सामान्याधिक अपस्करण
**hypernormality,** *n.* अतिप्रसामान्यता (स्त्री.)
**hyper-Poisson distribution,** अतिप्वॉसाँ वितरण
**hypothesis,** *n.* परिकल्पना (स्त्री.)
**hypothetical,** *adj.* परिकल्पित
**hypothetical population,** परिकल्पित समष्टि

# I

**'Ideal' index number,** आदर्श निर्देशांक
**idealised experiment,** आदर्शीकृत प्रयोग
**identical categorisations,** अभिन्न वर्गीकरणे
**identical distribution,** समान वितरण
*cf.* common distribution
**identical errors,** समवितरण दोष
**identical experiments,** अभिन्न प्रयोग
**identically distributed,** समान वितरित
**identical trials,** समान प्रयत्न
**identifiability,** *n.* अभिज्ञेयता (स्त्री.)
**identifiable,** *adj.* अभिज्ञेय
**identification,** *n.* १ अभिज्ञान (न.) २ अभिनिर्धारण (न.) (as in : problem of identification अभिनिर्धारण समस्या)
**identity,** *n.* १ अभिज्ञान (न.), ओळख (स्त्री.) २ नित्यसमीकरण (न.)
**idle balance,** रोख निष्क्रिय शिल्लक
**idle period,** निष्क्रिय अवधि
**idle probability,** निष्क्रिय संभाव्यता
**IID,** (*abbr.* of independent and identically distributed) निसवि (निरवलंबी व समान वितरित)
**i. i. d. r. v.,** (*abbr.* of independently identically distributed random variable) नि. स. वि. या. च. (निरवलंबी समान वितरित यादृच्छिक चल)
**illegitimacy,** *n.* अनौरसता (स्त्री.)
**illusory association,** आभासी साहचर्य
**illusory correlation,** आभासी सहसंबंध
*cf.* nonsense correlation, निरर्थक सहसंबंध
**imbedded Markov chain,** अंतःस्थापित मार्कोव्ह साखळी
**imbedded process,** अंतःस्थापित प्रक्रम
**immediate delivery,** तात्काळ पोचवणी
**immigration,** *n.* आप्रवास (पु.)
**implicit enumeration,** अव्यक्त प्रगणन
**implicit strata,** गर्भित स्तर
**implicit weighting,** गर्भित भारण
**importance sampling,** महत्त्वानुसारी नमुना-निवड
**improbable achievement test,** असंभाव्य कामगिरी कसोटी
**imputation,** *n.* आरोपण (न.)
**inadmissible,** *adj.* अननुज्ञेय
**incidence matrix,** आपात सारणी
**incidence matrix of design,** संकल्पन आपात सारणी
**incidence rate** = attack rate
**incidental parameters,** आनुषंगिक प्राचले
**incidental sampling,** आनुषंगिक नमुनानिवड
**inclusion,** *n.* समावेश (पु.), अंतर्भाव (पु.)
**inclusive type of a class interval,** वर्ग अंतराळाचे समावेशक प्रकार

**incomplete beta function,** अपूर्ण बीटा फल
**incomplete block,** अपूर्ण खंड
**incomplete census,** अपूर्ण प्रगणना
**incomplete enquiry,** अपूर्ण चौकशी
**incomplete gamma function,** अपूर्ण गॅमा फल
**incomplete latin square,** अपूर्ण लॅटिन चौरस
**incomplete moment,** अपूर्ण परिबल
**incomplete multiresponse design,** अपूर्ण बहुप्रतिसाद संकल्पन
**inconsistent estimator,** विसंगत आकलक
**increasing hazard rate,** धोक्याचे वाढते मान
**increment,** *n.* वाढ (स्त्री.)
**incremental,** *adj.* वाढीव
**indecomposable,** *adj.* अविघटनीय
**independence,** *n.* निरवलंबन (न.)
**independence frequency,** निरवलंबन वारंवारता
**independence of experimental error,** प्रायोगिक दोषांचे निरवलंबन
**independent action,** निरवलंबी अभिक्रिया
**independent and identically distributed,** (*abbr.* IID) निरवलंबी व समान वितरित (निसवि)
**independent event,** निरवलंबी घटना
**independent $\sigma$-field,** निरवलंबी $\sigma$-क्षेत्र
**independently identically distributed random variable,** (*abbr.* **i. i. d. r. v.**) निरवलंबी समान वितरित यादृच्छिक चल (नि. स. वि. या. च.)
**independent trial,** निरवलंबी प्रयत्न
**independent variable,** स्वचल (न.), निरवलंबी चल
**index,** *n.* १ घातांक (पु.) (as in : $\alpha$ index $\alpha$ घातांक) २ निर्देशांक (पु.) (as in : index abnormality अपसामान्यता निर्देशांक) ३ सूचकांक (पु.) (as in : despersion index अपस्करण सूचकांक)
**index number,** निर्देशांक (पु.)
**index of abnormality,** अपसामान्यता निर्देशांक
**index of attraction,** आकर्षण निर्देशांक
**index of concentration,** संकेंद्रण निर्देशांक
**index of connection,** संबंधन निर्देशांक
**index of dispersion,** अपस्करण निर्देशांक
**index of dissimilarity,** असादृश्य निर्देशांक
**index of evolution,** विकास निर्देशांक
**index of oscillation,** दोलन निर्देशांक
**index of reliability,** विसंबनीयता निर्देशांक, विश्वसनीयता निर्देशांक
**index of response,** प्रतिसाद निर्देशांक
**index of reversion,** (indice di reversione) व्युत्क्रमण निर्देशांक
**indicator,** *n.* निर्देशक (पु.)
**indicator function,** द्योतक फल
**indices of difficulty,** काठिण्य निर्देशांक
**indifference,** *n.* १ उदासीनता (स्त्री.) २ स्थिरलोप (पु.) ३ समसमाधान (न.)
**indifference-level index number,** स्थिरलोप स्तर निर्देशांक
*cf.* Konyus index number, कोन्यस निर्देशांक
preference–field index number, अधिमान क्षेत्र निर्देशांक
**indifference map,** समसमाधान वक्र आलेख
**indirect enquiry,** अप्रत्यक्ष चौकशी
**indirect least square,** अप्रत्यक्ष लघुतम वर्ग
**indirect sampling,** अप्रत्यक्ष नमुनानिवड
**indistinguishable,** *adj.* सारखा
**individual item,** प्रत्येक वस्तु
**induced oscillation,** प्रेरित दोलन
**induced probability distribution,** प्रेरित संभाव्यता वितरण
**inductive behaviour,** विगामी वर्तन

